# अनुक्रमणिका

जिनें आपल्या अंगच्या गुणांनीं
आपल्या भोंवतालच्या जगास
बकुळीच्या फुलांप्रमाणें सुख-
विलें व जी लवकरच
मातींत मिसळून
गेली त्या

## चि. शरयूस

हीं

**बकुळीचीं फुलें**

मी अर्पण करितों.

**लेखक**

# प्रस्तावना

माझ्या या प्रस्तुतच्या पुस्तकास 'बकुळीची फुलें' हें नांव तर दिलें आहेच, पण यांत लघुकथा आहेत कीं हें सगळें लघुनिबंधांचें पुस्तक आहे याचा वाचकांस प्रश्न पडेल. यांतील पुष्कळसें लिखाण जुनेंच आहे, व तें बहुतेक माझ्या ओळखीच्या पुष्कळशा मित्र–मैत्रिणींस मी वाचावयास दिलें होतें. तें कांहींस आवडलें, कांहींस नावडलें. मी त्यांतील कांहीं, मासिकांतून प्रसिद्ध करण्याचा प्रयत्न केला व त्यांत फारसें यश न आल्यानें आतां सवड होतांच स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध करीत आहें. पण यास लघुकथासंग्रह म्हणावयाचें कीं लघुनिबंधसंग्रह, हा प्रश्न शिल्लक राहतोच. माझ्या मित्रमंडळींत यांत बरेंच दुमत आहे. पुष्कळजण यास 'लघुनिबंध' म्हणूं इच्छितात. पण मी मात्र यास 'लघुकथा'च म्हणूं इच्छितों. रा. खांडेकरांनीं 'दत्तक व इतर गोष्टी'च्या प्रस्तावनेत वर्णन करून सांगितलेल्या उत्कृष्ट पाश्चात्य लघुकथालेखकांच्या कथांपैकीं पुष्कळशा लेखकांच्या नांवापलीकडे मला त्यांची माहिती नाहीं. एकदोघाची नांवें सुद्धां मला माहीत नाहीत. रा. य. गो. जोशी यांनीं प्रसिद्ध केलेल्या "आवडत्या गोष्टी"च्या प्रस्तावनेंत गुरुवर्य प्रो. लागू यांनी उल्लेख

केलेल्या कांहीं लेखकांचीं नांवेंही मला माहीत नाहींत. माझें इंग्रजी भाषें-तीलच काय, पण मराठी भाषेंतीलहि लघुकथांचें वाचन बेताबाताचेंच अ हे, तरीही मी माझ्या लिखाणास 'लघुकथा' च म्हणूं इच्छितों. लघु-कथांचें स्वतंत्र ' तंत्र ' आहे व तें माझ्या हातून कितपत पाळलें गेलें आहे तें मला माहीत नाहीं. मला या लिखाणाची जी कांहीं माहिती आहे व लघुकथांसंबंधीं जी तुटपुंजी माहिती आहे त्याचे आधारावर मी त्यांस 'लघुकथा'च म्हणणार आहे.

* * *

मी लिहिलेल्या सर्वच 'कथा' सत्य आहेत. त्यांत माझे स्वतःचेच अनु-भव आहेत. व ते कथन करतांना व्यक्ति, स्थळ, काळ वगैरेंचा योग्य तो फरक केला आहे आणि हे करीत असतांना कोणत्याही व्यक्तीचा अपमान करण्याचा किंवा त्याला कमीपणा आणण्याचा माझा प्रयत्न नाहीं. त्याच-प्रमाणें बहुतेक गोष्टी ज्यांचा ज्यांचा अनुभव घेऊन लिहिल्या आहेत त्यांस त्या दाखविलेल्या आहेत व त्यांबद्दल त्यांस विशेष कांहीं वाटलेलें नाहीं. असें असूनही मी त्यांस '**सत्यकथा**' असें नांव देऊं इच्छीत नाहीं. आंग्ल नाटककार शेक्सपियरला सर्वांत Impersonal (स्वानुभवाबद्दल व स्वचरित्रविषयक माहिती न देणारा) लेखक म्हणतात. पण त्याचेवरच टीकात्मक पुस्तक लिहिणारे प्रो. रॅले हे English Men of Letters या ग्रंथमालेंतील Shakespeare या ग्रंथांत असें म्हणतात कीं कोणालाच स्वतःच्या सावलीबाहेर चालतां येत नाहीं. आणि याला शेक्सपीयरसुद्धां अपवाद होत नाहीं! त्यानें कदाचित् स्वानुभव फारच कौशल्यानें व सफाईदार तऱ्हेनें आपल्या कृतींत गोंवले असतील; म्हणून ते साध्या दृष्टीच्या माणसास कळत नाहींत, एवढेंच. मला प्रो. रॅले या विद्वानांचें म्हणणें अगदीं तंतोतंत पटलें आहे. म्हणून मला वाटतें "सत्यकथा" या नांवांत कांहीं फारसा आकर्षकपणा किंवा नाविन्य नाहीं. कारण प्रो. रॅले यांचे मतानें सर्वच कथा थोड्या फार फरकानें ' सत्य ' असतात.

* * *

भाषा शास्त्रासंबंधीं म्हणे एक नियम आहे–आधीं भाषा, व मग तिचें तंत्र म्हणजे व्याकरण, निर्माण झालें. माझ्या गोष्टींचें असेंच झालें.

आधीं माझ्या या पुस्तकांत छापलेल्या गोष्टींपैकीं पहिल्या दोन, व इतर न छापलेल्या तीन, लिहून झाल्या; व मग मला त्यांतलें तंत्र सांपडलें! मी हें पुस्तक ज्या माझ्या आवडत्या भाचीला अर्पण केलें आहे ती, व तिची धाकटी बहीण कु. प्रभावती घारपुरे, यांनी माझा गोष्ट सांगण्याबद्दल अगदीं पिच्छा पुरवला होता. एक दिवस ( वधू परीक्षा नाटक पाहून आल्यानंतर २।४ दिवसांतच ) मी त्यांस सांगितलें, कीं, दुसऱ्या दिवशीं मी त्यांचीच एक गोष्ट लिहून त्यांस ती वाचून दाखवीन. व खरोखरच दुसऱ्या दिवशीं मी माझी पहिलीच गोष्ट त्यांस वाचून दाखवली. ती, गोष्ट म्हणून नसेल, परंतु त्यांस स्वतःची हकीगत म्हणून आवडली. त्यानंतर त्यांच्यांत व माझ्यांत खालील संवाद झाला. एकीनें विचारलें—" तू तर गोष्टींत लिहिलें आहेस कीं आम्हांस एक एक लेमनची बाटली पाजलीस, पण आम्हांस खरोखर पाजलीस कुठें रे ? लबाड कुठचा...."

" पण तुम्हांस टांग्यांतून थिएटरांत नेलें होतें, तें तरी कुठें गोष्टींत लिहिलें आहे ? तो टांगेवाला दारू प्यायला होता व त्याच्या बडबडीनें तुम्ही खूप भ्यायलां........"

" खरं रे खरं, मला बाई त्याची फाऽऽर भीति वाटली."

" मग.... गोष्ट लिहितांना कांहीं कमीजास्त करतात व मी तसेंच केलें आहे तुमच्या या गोष्टींत."

माझे ४।५ अनुभव मी गोष्टीरूपानें ग्रथित करून ते लिहून काढले. नंतर मला मी थोडक्याच महिन्यांपूर्वी अभ्यास केलेल्या प्रसिद्ध आंग्ल लेखक Maurice Hewlett यांच्या The Chrystal Vase या निबंधांतील कांहीं तत्त्वांची आठवण झाली. माझें लेखन त्या तत्त्वांना अनुसरूनच असल्यामुळें त्यांत कांहीं माझें फारसें चुकलें नाहीं; उलट नकळत आपण त्यांच्या विचाराबरहुकूम काम केलें आहे याबद्दल समाधान वाटलें. ह्यूलेट म्हणतात—

" I have often wished that I could write a novel, in which, as mostly in life, thank goodness, nothing happens. Jane Austen, it has been objected, forestalled me there, and it is true that she very nearly did—but not quite. It

was a point for her art to make that the novel should have form, form involved plot, plot a logic of events; well, that means that there were collisiosns" (माझ्या मनांतून अशी एक कादंबरी लिहावयाचें होतें कीं जिच्यांत सर्व-साधारण माणसांच्या आयुष्यक्रमाप्रमाणें कांहींच विशेष घडत नाहीं. ह्या बाबतींत जेन ऑस्टिननें माझ्यापुढें आघाडी मारलेली आहेच. व तिला तें माझें ध्येय जवळ जवळ साधलें हेंही खरें आहे. तिच्या कलेंत कादंबरीला सांचा असणें अवश्य होतें. कांहीं एक विशिष्ट पेहेराव किंवा सांचा म्हटल्या-वर उठाव येण्यासारखे प्रसंग आले. प्रसंगाबरोबरच त्यांची तर्कशुद्ध मांडणी, .... म्हणजे या सर्वाचा अर्थ असा झाला कीं तिच्या कादंबऱ्यांत टक्करी किंवा अपघात आले.)

सर्वसाधारण मनुष्यास त्याच्या नेहमीच्या आयुष्यक्रमाचा इतका वीट आलेला असतो कीं त्यांत विशेष कांहीं मन रमविण्यासारखें आहे असें त्यास वाटत नाहीं. म्हणूनच सामान्य वाचकांस समाजाचें नेहमीचेंच चित्र आवडत नाहीं. त्यांत थोडें अतिरंजित असें वर्णन पाहिजे. तसें नसेल तर गम्मत वाटत नाहीं. Mr. A. A. Milne (मि. मिल्न) यानीं आपल्या The Diary Habit (डायरी लिहिण्याची संवय) या निबंधांत लोक डायरी लिहिणें कां सोडतात याची एक सुंदर कारणमीमांसा केली आहे. ते म्हणतात—

A diary would be worth writing up, if it could be written like this:—

*Monday*:—"Another exciting day. Shot a couple of hooligans on my way to business.... ....Went out to lunch and saw a runaway elephant in the Strand........

*Tuesday*:—"Letter from solicitor informing me that I have come into £. 1,000,000 through the will of an Australian gold digger named Tomkins .... I was interrupted by a madman with a razor who demanded £. 100. Shot him after a desperate struggle...."

वरील सगळ्याचा मथितार्थ एवढाच की अनपेक्षित किंवा चमत्कृति-जन्य हकीगती आपणांस लिहून ठेवण्यास जास्त आवडतात. नेहमीच्या आयुष्यांत कांहीं घडत नाहीं, व दररोज "सकाळीं उठलों, चहा घेतला, ऑफिसांत किंवा कोर्टांत .... गेलों. .... संध्याकाळीं क्लबांत गेलों, पत्ते खेळलों, रात्रीं जेवून.... निजलों" असलें ठराविक साचाचें लिखाण लिहिणें आवडत नाहीं. म्हणून हल्लीं लोक डायरी लिहीतनासे झाले आहेत.

असें असलें तरी ह्यूलेट साहेब आवेशानें यास खालील गमतीदार उत्तर देतात.—

Why is it, do you suppose, that anybody, if he can will read anybody else's letter? It is because every man-Jack of us lives in a cage cut-off from every other man—Jack....It is our state of soul, our mental process under the stress which never is the same for two moments together, there is ample material for a novel of extreme interest.

[दुसऱ्याचें पत्र आपल्या हातांत पडल्यास तें वाचण्याचा मोह आपणास कां होतो? (पत्रांतून खाजगी मजकूर वाचावयास मिळतो म्हणून.) प्रत्येक मनुष्याजवळ पुष्कळच खाजगी असतें व तें तो दुसऱ्यापासून काळजी-पूर्वक चोरून ठेवीत असतो. आपलें मन क्षुल्लक वेदनेनेंदेखील आंदोलन घेत असतें. मनाची स्थिति दर दोन क्षणांत बदलते. मग हें स ँ साहित्य एकादी सुदर व चित्तवेधक कादंबरी लिहिण्यास अपुरें आहे काय?]

हीं एवढीं पुष्कळ व निरनिराळीं अवतरणें देण्याचा उद्देश एवढाच कीं माझ्या गोष्टी जरी अगदीं साध्या नेहमींच्या आयुष्यांतील सामान्य अनुभवावर आधारलेल्या असल्या तरी त्यांत एखाद्या व्यक्तीला कांहीं तरी मानसिक त्रास होणें व तो कां झाला कसा झाला, त्याचें पर्यवसान कसें झालें वगैरे सांगण्याकडे माझा बहुधा प्रत्येक गोष्टीत कल आहे. माझा प्रयत्न कितपत साधला आहे किंवा त्यांत कांही दोष आहेत तें पाहणें वाचकाचें काम.

* * *

लघुकथांच्या तंत्रांसंबंधी मी कांहीच वाचलें नाहीं, पण Mr. Hudson यांच्या An Introduction to the study of Literature ह्या पुस्तकाचे शेवटी The study of the short story हें प्रकरण (सुमारें डझन पानें ) मात्र मी वाचलें व त्यामुळें मला माझ्या लिखाणास निबंधापेक्षां गोष्टी हेंच नांव देणें योग्य वाटतें. गोष्टींबद्दल त्यानीं कांहीं नियम सांगितले आहेत व त्यांतले कांही माझ्या लिखाणास लागू पडतात. तेव्हां या प्रसिद्ध विद्वानाच्या मताचा आधार घेऊन मी माझ्या लिखाणास गोष्टी म्हटल्यास त्यांत वावगें काय आहे बरें ? त्यानीं सांगितलेले व माझ्या लिखाणास लागू पडणारे नियम मी खालीं देतों:—

It (short story) cannot exhibit life in its variety and complexity. In it we meet people for a few minutes and see them in a few relationships and circumstances (आयुष्यांतील अनेक भानगडी व विविधता आपणास लघुकथेमध्यें आढळणार नाहीत. आपणांस थोडच्या व्यक्ति कांहीं थोडचाशा प्रसंगीं आढळतात व त्याच्यांतील थोडेसे परस्पर संबंध आपणास समजतात. )

It should impress us as absolutely clear in outline. well proportioned and within its own framework compeltc. (लघुकथा कळायला स्पष्ट, प्रमाणबद्ध व स्वतःचे दृष्टीनें अगदीं पूर्ण असावी.)

The story should have a unity of motive, of action, and of impression....Singleness of action and singleness of effect are two great canons by which we have to try the value of a short story as a piece of art. ( लघुकथा लिहितांना घटना, आणि लेखकाचा उद्देश एकच असावा, कथासूत्र एक असावें, व त्याचा वाचकाचे मनावर एकच परिणाम घडावा. एकच परिणाम आणि एकच घटना हीं लघुकथेची कला या दृष्टीनें किंमत करावयाचीं महत्त्वाचीं मोजमापें आहेत.)

A dramatic incident or situation, a telling scene; a closely co-ordinated series of events; a phase of character; a bit of experience; an aspect of life; a moral problem, and

innumerable other motives which might be added to the list, may be made the nucleus of a thoroughly satisfactory story. (आयुष्यांतील एखादी चमत्कृतिजन्य घटना, एखादा परिणामकारक प्रसंग, एकमेकांशीं संलग्न असणाऱ्या किंवा एकमेकींमधून उद्भूत होणाऱ्या अशा हकीगती, मनुष्यस्वभावाची एक छटा, एक छोटासा अनुभव, आयुष्यांतील एक लहानसें दालन, एखादा नीतिविषयक प्रश्न, .... किंवा आणखी अगणित इतर गोष्टी, एखाद्या लघुकथेची आधारभूत कल्पना किंवा लघुकथेचा गाभा होऊं शकेल; व त्यामुळें अगदीं समाधानकारक लघुकथा निर्माण करतां येईल.)

माझ्या संग्रहांतील दोनच अशा ज्या त्यांतल्या त्यांत लांबट कथा आहेत, त्यांतील हेतु एकच व स्पष्ट नाहीं असें चटकन पुष्कळांस वाटेल. पण दुसऱ्या म्हणजे–**अजाण कावेरीचा प्रश्न**–या गोष्टींतील महत्त्वाचें किंवा आधारभूत वाक्य काय आहे तें सांगण्याचें प्रयोजन नाहीं; पहिल्या–**वधु-परीक्षा कीं वरपरीक्षा ? ( की कांहींच नव्हे )** गोष्टीला तसें लांबट नांव देण्याचें कारण त्यांतील एकच एक हेतु वाचकांचे लक्षांत येण्यास मदत व्हावी हाच आहे.

यांतील प्रत्येक गोष्टीचा, वाचकांचे मनावर, ती वाचल्यानंतरच एक, सा उमटावा अशी लेखकाची अपेक्षा आहे. उत्कृष्ट लघुकथांच्या संबंधानें असाही एक दंडक सांगितलेला आहे की त्यांत एकही वायफळ वाक्य किंवा शब्द नसावा. प्रत्येक शब्द किंवा वाक्य असें असावें कीं जें गोष्टींतून काढलें तर त्यानें गोष्टीची हानी व्हावी. माझ्या कथा या दृष्टीनें अगदी तिसऱ्या वर्गांतील ठरल्या तरी त्यांत मला फार समाधान व आनंद होणार आहे; कारण आधीं त्या नापासच झालेल्या आहेत!.... मी फर्स्ट क्लासांत येण्याची स्वप्नांतही अपेक्षा करीत नाहीं.

या लघुकथांत एक गोष्ट वाचकांचे चटकन लक्षांत येईल, आणि ती ही कीं जवळ जवळ निम्या सुरवातीच्या गोष्टींत संभाषणाला अजिबात फांटाच दिलेला आहे. पुढच्या गोष्टींतून तें थोडेंफार आढळतें. माझ्या एका लेखक मित्राकडून मला असें कळलें कीं, संभाषण लिहितां येणें ही फार कठीण गोष्ट आहे, व ती चटकन् साधत नाहीं. मला स्वतः देखील अनुभवानें तसेंच

वाटतें. पण याहीं बाबतींत Mr. Hudson यांचें खालील वाक्य वाचून मी माझें या बाबतींतल्या कमीपणाबद्दलही थोडें समाधान मानून घेतों.

Method must ultimately depend upon matter and purpose. A story may, for example, contain little or no dialogue or it may be nearly all dialogue.

लघुकथाबद्दल, बहुधा एकसूत्रीपणा येण्याचे दृष्टीनेंच असेल,असा एक नियम सांगितला आहे कीं ती एकाच बैठकींत वाचून होईल एवढी मोठी असावी. माझ्या कथांपैकीं कांहीं एकाच बैठकींत लिहिलेल्या आहेत! कांहीं एकाच दिवसांत संपविलेल्या आहेत. दोनच गोष्टींना जरा जास्त वेळ लागला आहे.

ही सर्व तंत्रविषयक चर्चा व अनेक इंग्रजी अवतरणें पाहून कांहींजण म्हणतील कीं लेखक आपल्या विद्वत्तेचें प्रदर्शनच करीत आहे. पण सुरुवातीसच मी असें स्पष्ट लिहिलें आहे कीं मजजवळ पांडित्य नाहीं, व लघुकथाविषयक माझें वाचन अतिशय थोडें आहे. पण हें सर्व लिखाण लिहिण्याचा मुख्य हेतू माझें लिखाण 'निबंध' या सदरांत जाऊं नये; तें "लघुकथा" ठरावें हा आहे. हा माझा हेतु साध्य झाला नसला तरी मला त्यांत दुःख वाटत नाहीं. पण आज लघुकथा वाचणाऱ्या शेंकडों वाचकांस या लघुकथेच्या तंत्राविषयीं अगदीं ढोबळ असे दोन चार नियम तरी पहावयास मिळतील यांतच मी माझें समाधान मानतों.

*　　　*　　　*

माझ्या अनेक मित्र-मैत्रिणींनीं या लघुकथा वाचून, व आपापलीं मतें मजजवळ प्रदर्शित करून, मला प्रोत्साहन दिलें व सूचना केल्या, त्यावद्दल मी त्या सर्वांचा फार आभारी आहे. सुरवातीस मला या प्रोत्साहनाची व उत्तेजनाची फार जरुरी होती, व तें मला मिळत गेल्यानें मी इतक्या गोष्टी लिहूं शकलों, याबद्दल मी त्या सर्वत्रांचे पुनः आभार मानतों. व्यक्तिविषयक उल्लेख करावयाचा नाहीं असें ठरविलें असलें तरी दोन व्यक्तींचा उल्लेख केल्याशिवाय राहावत नाही. एक म्हणजे माझे मित्र व प्रसिद्ध "ऐतिहासिक पोवाडे," 'वसईची मोहीम' वगैरे ग्रंथ लिहिणारे रा. यशवंत नरसिंह केळकर, वाङमयविशारद, दुसरे म्हणजे सर परशुरामभाऊ कॉलेज-

मधील प्रोफेसर व कांहीं मासिकांचे संपादक श्रीयुत ज. नी. कर्वे, एम्. एस्सी, हे होत. रा. केळकरांनीं लिहिण्यास उत्तेजन दिलें, व प्रो. कर्वे यांनीं एक लघुकथा व एक टीकालेख (ही लघुकथा या संग्रहांत छापली नाहीं.) "सूर्यकांत" मासिकांत प्रसिद्ध केली म्हणून यांचा विशेष उल्लेख करणें अवश्य वाटतें.

सरतेशेवटीं आणखी एका प्रसिद्ध व्यक्तीचे आभार मानून ही प्रस्तावना आटोपती घेतों. प्रो. दत्तो वामन पोतदार या एकट्याच विद्वानांनी माझे चुलते ती. सीताराम केशव दामले हे मृत्यु पावल्यानंतर मला एक सांत्वनपर पत्र पाठविलें होतें. त्यांत त्यांनीं माझे घराण्यांतील वाङ्मयसेवा केलेल्या तीनही पुरुषांचा गौरव केला, व शेवटीं मीही त्यांच्या मार्गावर पाऊल ठेवून कांहीं काम करण्यास सुरुवात करावी अशा प्रकारचें प्रोत्साहन त्यांनीं मला अप्रत्यक्षपणानें दिलेलें होतें. तें मी या जन्मांत विसरणार नाहीं. त्यांचें पत्र समग्रच खालीं देतों.

श्री

कार्तिक शु० ८।१८४६
पुणें

सप्रेम सा. न. वि. वि.

मी कर्नाटकांत फिरतीवर गेलों होतों, तो नुकताच परत आलों. तों रा. सीतारामपंत दामले यांचे मृत्यची वार्ता कळली! ऐकून परम दुःख झालें! कै. सीतारामपंत यांचे मृत्यूनें मराठी साहित्याचा अभिमानी असा विद्वान् लेखक नाहीसा झाला आहे. रा. दामले यांची लेखणी ओजस्वी होती. मोरोपंत काय, सीतारामपंत काय किंवा कृष्णाजीपंत काय सर्व सरस्वतीचे लाडके पुत्र होते. कार्लाईलचें चरित्र पुनः छापण्याविषयीं मी त्यांस एकवार बोललों होतों व तें जरा वाढवून छापण्याचा विचार आहे असें ते मला म्हणाले! आतां हा सर्व भार तुम्हां आम्हां अवशिष्टांवर आहे! दामले घराणें या त्रिवर्ग बंधूंनीं अजरामर केलें. ही कीर्ति त्यांच्या वंशजांनीं सतत संभाळली पाहिजे. कळावें बहुत काय लिहिणें ही विनंति.

**दत्तो वामन पोतदार.**

इतकें लहान पण इतकें सुंदर पत्र लिहून त्यांनीं माझे घराण्याचा गौरव केला आहेच पण त्याजबरोबर मजवर फारच मोठें ओझें लादून दिलें. कारण आमचे घराण्यांत चालू पिढीमध्यें सारे तीनच पुरुष आहेत. पैकीं एकाचें शिक्षणच झालें नसल्यानें तो हा भार स्वीकारण्यास दुर्दैवानें असमर्थ आहे. दुसरे एक बी. ए. एल्एल्. बी. असून हा भार सांभाळण्यास लायक आहेत; पण त्यांस तूर्त बहुधा कुटुंबभार वाहण्याच्या उद्योगाव्यतिरिक्त दुसरा उद्योग करावयास फारसा वेळच मिळत नसावा. माझ्यावरचें ओझें फेडण्याचा "श्रीगणेशा" जो मी थोडथोडा गेलीं ६।७ वर्षें केला तोच आज महाराष्ट्रीय वाचकवर्गापुढें ठेवीत आहें. त्याच्या पुढचे धडे गिरविण्याची माझी उमेद आहे. आणि त्या बाबतींत मला मराठी वाचकवर्गाकडून प्रोत्साहनही मिळेल अशी आशा मी करूं नये काय?

महिलाश्रम हायस्कूल
हिंगणें बुद्रुक, पुणें नं. ४
गणेश चतुर्थी शके १८५८

दत्तात्रय मोरेश्वर दामले

# थिएटरमधील नेहमींचाच एक अनुभव

मी स्वतः ललितकलादर्श मंडळीचा मोठा भक्त. सर्व संगीत नटांत सध्यां तरी मला रा. पेंढारकरांचें गाणें व त्यांचे कंपनींतल्या नटांचा अभिनय जास्त आवडतो. तेव्हां माझी वार्षिक परीक्षा झाल्यावर मी त्या कंपनीचें नाटक पहावयास जाणें अगदीं स्वाभाविकच होतें. साधारणतः ज्या दिवशीं परीक्षा संपून विद्यार्थी वर्ग मोकळा होतो त्या दिवशीं सिनेमानाटकांचीं थिएटरें चिक्कार भरतात. माझी बी.ए.ची परीक्षा ता. ५ एप्रिल रोजीं संपली. तेव्हां ६ तारखेच्या नाटकाला मी जाणें यांत विशेष नवल नव्हतें!

एप्रिलच्या सुरुवातीसच माझ्या दोन भाच्या आपल्या आईबरोबर नागपूर प्रांतांतून उन्हाळ्यानिमित्त येथें आल्या होत्या. त्यांना ता. ५ रोजीं संध्याकाळीं सहज फिरावयास नेलें असतांना त्यांनीं मला इतर गप्पागोष्टी करतांना "निदान रस्त्यांत तरी फिरत असतांनाच 'गंधर्व' व रा. 'पेंढारकर' यांस केव्हां तरी आम्हांस दाखव" म्हणून माझी विनवणी केली होती. ह्यांत कदाचित् कित्येक विचारी मंडळीस माझ्या ८।१० वर्षांच्या भाच्यांबद्दल तिटकारा

वाटेल, व ती मनांत म्हणतील "काय पण शिक्षण आहे, मुलींना! एव्हांपासून नाटक्यांचा छंद !" पण, त्यांनीं जर माझ्या भाच्यांस एकवार पाहिलें तर त्यांस आपले शब्द परत घ्यावे लागतील. त्यांच्या घरीं वऱ्हाड—नागपूरकडील सुखवस्तु गृहस्थांप्रमाणें फोनोग्राफ मशीन असून गंधर्व—पेंढारकर यांच्या प्लेटांचा भरणा आहे. या ग्रामोफोनमुळें त्यांस गाण्याची आवड होती व ह्या दोन नटांबद्दल कुतूहलहि वाटत असे. शिवाय वर्तमानपत्रांतील जाहिरातींवरून किंवा गांवांत भिंतींवर लागलेल्या जाहिरातींवरून त्यांस ललितकलादर्श कंपनी पुण्यांतून लवकरच जाणार व गंधर्व नाटक मंडळी पुण्यास लवकरच येणार ह्या हकीगती समजल्या होत्या. तेव्हां 'नाटक पहाण्यास ने' येवढी पैशांसंबंधींच्या खर्चाची व म्हणून थोडी कठीण मागणी मागण्याऐवजीं लहानशी, बिनखर्चाची व जिज्ञासापूर्ती करणारी सोपी अशीच मागणी त्यांनीं केली होती. ह्या त्यांच्या सौजन्याचा माझ्या मनावर परिणाम होऊन मीं अगदीं एकाएकीं असा ता. ६ रोजींचा 'वधूपरीक्षा' हा खेळ त्यांस दाखवावयास नेण्याचें ठरविलें. मला स्वतःला या कंपनीचीं या नाटकापेक्षां दुसरींच इतर नाटकें त्या काळपर्यंत आवडत होतीं. पण, ह्या कंपनीचा हा वधूपरीक्षा खेळ पुण्याच्या मुक्कामांतील शेवटचाच असल्यानें तोच दाखविणें मला भाग पडलें. पण त्या दिवशींच्या प्रयोगामुळें माझें त्या नाटकाबद्दलचें वाईट मत मात्र दूर झालें.

आम्ही थिएटरमध्यें सुरुवातीनंतरच पोंचलों. त्या वेळेपर्यंत गर्दी पुष्कळ झाली होती. तिकिटें आगाऊ काढलीं नव्हतीं म्हणून चांगली जागाच मिळेना. अखेरीस बराच विचार करून शेवटीं सव्वादोन

रुपये दराचीं दुसऱ्या मजल्यावरील साइडगॅलरींतल्या खुर्च्यांचीं तिकिटें काढलीं, व जागांवर जाऊन बसलों. ह्या वेळपर्यंत पहिल्या अंकाचा जवळजवळ एकतृतीयांश भाग संपून गेला होता.

नाटकाचे दोन अंक संपले. लहान मुलींना एकदां बाहेर नेऊन त्यांस काय हवें नको त्याची चौकशी केली. व त्यांस एक एक लेमनची बाटली पाजली. अशाच प्रकारें दर अंकाच्या शेवटीं मुलींस जाग्यावर बसवून मी मात्र पाय मोकळे करावयास बाहेर जात असें. क्वचित् कोणी ओळखीचे भेटल्यास गप्पा किंवा चहापान देखील झालें असेल माझें, आतां त्याची आठवण नाहीं. पण बाहेर जातांना मी मुलींस जपून राहण्यास सांगत असें.

माझ्याजवळ नाटकाचें पुस्तक होतें. साधारणपणें आगगाडीच्या डब्यांत अगर नाटकाच्या वेळीं थिएटरांत, वर्तमानपत्रें अगर पुस्तकें आपल्या शेजारच्या अनोळखी गृहस्थांकडून देखील मागण्याचा किंवा आपल्याजवळचीं त्यांस देण्याचा शिष्टसंप्रदाय आहे. त्याच-प्रमाणें माझ्या पुस्तकावर शेजाऱ्यापाजाऱ्यांकडून मागणी येत असे व मी त्यांचा अव्हेर करीत नसे.

एका अंकाचे वेळीं आमच्या मागच्या बाजूस असणाऱ्या गॅलरीं-तील बांकावर बसलेल्या एका मध्यमवयस्क पण सुशील बाईनीं माझ्या भाच्यांकडून माझें पुस्तक पाहण्यास घेतलें होतें. मी जागे-वर येऊन बसल्यावर पुस्तकाबद्दल चौकशी केली तेव्हां मुलींनीं पाठीमागच्या बाईंना तें दिल्याचें सांगितलें. त्या अंकाच्या प्रारंभींचा भाग गैरमहत्त्वाचा असल्यामुळें मी त्या वेळीं पुस्तक मागून न घेतां तसेंच त्या बाईंजवळ राहूं दिलें. त्या स्त्रीजवळ तिच्याच नात्या-गोत्याच्या अगर जवळच्या संबंधाच्या एकदोन मुली होत्या. ही गोष्ट

मी जेव्हां बाहेर जात असें किंवा जाग्यावर येऊन बसत असें त्या वेळीं माझ्या लक्षांत आली होती. केवळ स्त्रीदाक्षिण्य एवढयाच कारणानें मी माझें पुस्तक त्यांजवळ न ठेवतां विशेषत: त्या वेळेस रा. पेंढारकरांचें किंवा दुसऱ्या कोणत्याच पात्राचें गाणें नसल्या-मुळें मीं माझें पुस्तक त्यांजजवळच राहूं दिलें. ज्या वेळीं मग एकदां पेंढारकरांचें गाणें सुरू झालें त्या वेळीं मीं माझें पुस्तक परत मागून घेतलें. रा. पेंढारकरांचें एक पद संपलें व नंतर पुन: दुसरें पद लवकर सुरू होणार नव्हतें म्हणून मी पुन: माझें पुस्तक त्या स्त्रियांस पाहण्यास दिलें. त्यावर आणखी एका पदाच्या वेळीं पुन: मी पुस्तक मागून घेतलें, व नंतर पुन: पुस्तक त्या स्त्रियांस देण्या-करितां हात पाठीमागें केला. पण या वेळेस त्या स्त्रियांनीं पुस्तक न घेतां खुणेनेंच तें नको म्हणून मला कळविलें !

साधारणपणानें मी स्त्रियांपासून जरा दूर दूर राहणारा तरुण आहें. पण त्या दिवशीं पुस्तकाच्या बाबतींत थोडें निराळें वर्तन केलें होतें खरें! त्या स्त्रियांनीं माझ्याकडून २।३ वेळां पुस्तक घेऊन याच वेळीं कां घेतलें नाहीं म्हणून मला थोडें आश्चर्य वाटलें व त्या स्त्रियांचा थोडासा राग देखील आला. पण करणार काय ? आपल्याच जागीं चडफडत बसलों, झालें !

अशा रीतीनें थोडया विमनस्कपणानें नाटक पहात असतांना माझी नजर समोरच्या गॅलरीकडे व लक्ष एकंदर प्रेक्षकवर्गाकडेच जास्त जास्त जाऊं लागलें. नाटकावरील माझें लक्ष तात्पुरतें तरी पार उडालें, व त्या स्त्रियांनीं पुस्तकाचा अव्हेर करून जो माझा अपमान केला होता त्याबद्दलचे विचार डोक्यांत थैमान घालूं लागले. अशाच प्रकारें काळ दवडत असतांना मला एक अजब दृश्य दिसलें व

त्यामुळें पुढें जास्त विचार केल्यावर माझा त्या स्त्रियांवरचा राग पार उडाला ! तें अजब दृश्यच आतां कथन करतों.

समोरच्या साइड गॅलरींत कांहीं पुरुष प्रेक्षक बसले होते. बायका साधारणपणें त्यांना 'खास राखून ठेविलेल्या' जागांत बसल्या होत्या. तरी देखील पांच सहा तरुणी समोरच्या 'फरंट' गॅलरींत, जाण्यायेण्याच्या रस्त्याला लागूनच अशा, कांहीं बांकावर एक गट करून बसल्या होत्या. कांहीं लहान मुली आपल्या भावांबरोबर अगर इतर नातलग पुरुषांबरोबरच पण समोरच्या फरंट गॅलरींत होत्या. साइड गॅलरींतील एक प्रेक्षक आपल्याजवळ ऑपेरा ग्लास अगर दुर्बिण घेऊन आले होते. अर्थात् फॅशनेबल प्रेक्षकांप्रमाणें त्यांनीं जर दुर्बिणीच्या साहाय्यानें नाटक पाहण्याचा व्यवसाय केला असता—नाटकांतील स्त्रीपात्रांच्या अंगसौष्ठवाचें अगर त्यांच्या वेषभूषेचें सूक्ष्म निरीक्षण केलें असतें—तर त्यांची गुणग्राहकताच दिसून आली असती. परंतु मी त्या गृहस्थांना नाटक ऐन रंगांत आलें असतांना रंगभूमीच्या उलट दिशेस असलेल्या फरंट गॅलरींत बसलेल्या त्या पांचसहा तरुणींकडे दुर्बिणींतून पाहतांना व शेजारच्या गृहस्थांशीं कांहीं कुज-बूज व हास्यविनोद करतांना पाहिलें! हा प्रकार पाहिल्यावर मात्र मला त्या गृहस्थांचा मनस्वी संताप आला. नाटक पाहावयास येऊन, नाटक पाहाणें बाजूलाच ठेवून स्त्रीप्रेक्षकांचें आशाळभूतपणानें निरी-क्षण करण्यांत त्या गृहस्थाला व त्याच्याच इतर इष्टमित्रांस काय आनंद झाला असेल तो असो! पण त्या इसमांस कांहीं आया-बहिणी देखील नसाव्यात, व सहृदयत्व तर त्यांच्या गांवीं देखील नसावें असेंच माझ्या मनाला त्या वेळीं वाटलें. कारण चांगल्या सुशील व सुविद्य घराण्यांतील पुरुषास कोणच्याही स्त्रीबद्दल आदर

व सन्मानबुद्धि वाटली पाहिजे; आणि जो पुरुष ह्यापेक्षां निराळ्या भावनांनीं स्त्रियांकडे पाहतो तो असभ्य किंवा पशुतुल्य कोटींत ढकलावयास मला कोणतीच हरकत दिसत नाहीं.

त्या समोरच्या गॅलरींतील प्रेक्षकांकडे पाहिल्यावर मग मात्र माझ्या पाठीमागें बसलेल्या स्त्रियांवरचा माझा राग पार उडाला. त्यांना बहुधा माझ्या पुस्तक देण्याच्या सलगीचा भलताच वाईट संशय आला असावा. कारण पुरुष जात कशी काय असते, विशेषत: तरुण विद्यार्थी तरुण स्त्रियांशीं सलगी करावयास काय काय युक्त्या प्रयुक्त्या योजितात, व नंतर त्यांजशीं कशा प्रकारचें दुर्वर्तन करतात याची त्यांना कांहींशी कल्पना असावी, आणि या कल्पनेच्या जोरावरच त्यांनीं माझी एखाद्या हलकट विचारांच्या तरुणाप्रमाणें कमी किंमत लेखिली असावी. खरोखरच जर त्यांनीं या सुविचारानें अगर सावधगिरीनेंच माझें पुस्तक घेण्याचें नाकारलें असलें तर मला त्यांत त्यांचा राग न येतां उलट त्यांच्या समयसूचकतेचें कौतुकच वाटेल. पण हें कळण्यास कोणताच मार्ग दिसत नाहीं. सगळा कल्पनांचाच खेळ आहे ! एवढी मात्र गोष्ट खास कीं आमच्या तरुणांनीं त्यांच्या सच्चारित्र्याबाबत अगर स्त्रियांबरोबरीच्या वागणुकीसंबंधीं बरीच दांडगी कमाई करून ठेविली आहे ! त्या कमाईमुळेंच बहुधा तरुण स्त्रियांच्या मनांत अलीकडील तरुणांसंबंधीं तिरस्कार व अविश्वास वाटत असला पाहिजे !!!

—रचनाकाळ मे १९२९.

# बोरीबंदरवरील इंट्रोडक्शन
## किंवा 'परस्पर-परिचय'

जून महिन्याची चौदावी तारीख होती. माई व तिचे यजमान भय्यासाहेब आपल्या मुलांबाळांसह आपल्या गांवीं म्हणजे उमरावतीस परत जाणार होते. उमरावतीस माझे मेहुणे हे E.A.C. च्या हुद्यावर होते. वऱ्हाड--नागपूर प्रांतांत वरिष्ठ दर्जाच्या सरकारी नोकऱ्या आपल्याकडच्या किंवा हिंदी माणसांस थोडया जास्त प्रमाणांत मिळतात. माई ही माझ्यापेक्षां चांगली सात आठ वर्षांनीं मोठी होती व तिला तीन सुरेख व गुटगुटीत मुलें होतीं. आतां तीं ग्लॅक्सोमुळें अगर डोंगऱ्यांच्या बालामृतानें गुटगुटीत झालीं होतीं कीं दुसऱ्या कशानेंच नव्हे, तर स्वतःच्या पिंडाच्या जोरावरच झालीं होतीं तें मला फारसें माहीत नाहीं. पण मी स्वतः त्यांना ग्लॅक्सो किंवा बालामृत पितांना पाहिलें नव्हतें, एवढें मात्र खरें ! . . . शिवाय ती मंडळी एकंदरींत स्टाइलिश् असल्याकारणानें मुलें जास्त गोजिरवाणीं दिसत. साधारणतः कोणत्याही कुलीन व सुखवस्तु

घराण्यांतील मुलें सर्वांस आवडतात, तर अशीं देखणीं व स्टाइलिश् मुलें कोणास मोहक वाटणार नाहींत ?

आमचें कुटुंब मुंबईचें राहणारें. माझे बाबा गिरगांवांत डॉक्टरी करीत असत. ते इकडचेच L. M. & S. होते, पण बरेच दिवस टिकाव धरून राहिल्याकारणानें व विशेष काळजीपूर्वक आणि आस्थेनें काम करणारे असल्याकारणानें लौकरच त्यांची प्रॅक्टिस जुळून गेली. सध्यां त्यांची हजार–दीड हजारपर्यंत मिळकत असे. पण, आम्ही गिरगांवांत राहात नव्हतों. बाबा एकटेच पुष्कळ वेळां गिरगांवांत राहात. त्यांनीं स्वतःकरितां एक ब्लॉक भाड्यानें घेतला होता, व त्यांचें एक लहानसें व स्वतंत्र बिऱ्हाडच त्यांनीं थाटलें होतें. आम्ही इतर मंडळी मात्र सांताक्रूजच्या आमच्या "कॉटेज" मध्येंच राहात होतों. मुद्दाम गैरसोय सोसूनही बाबांनीं अशीं दोन बिऱ्हाडें केलीं होतीं, व त्याचें कारण म्हणजे त्यांचें आमच्या आई-वरील अलोट प्रेम. तिच्या पाठीमागें आम्ही तीन भावंडेंच त्यांना मायेचीं अशीं होतों. लहानपणीं माई ही अशक्त प्रकृतीची असे. दादा हा अलीकडेच चांगला सुधारला होता, पण तो शाळेंत असतांना व विशेषतः मॅट्रिकच्या वर्गांत असतांना फारच रोडावला होता. मी साधारणतः चांगली सशक्त होत्यें, म्हणून घरांत माझा जरा हेवा होत असे. आमची आई ३।४ वर्षांपूर्वीच वारली होती. या कारणानें तर बाबा आम्हांला कॉलेजांत देखील आगगाडीनेंच यावयास भाग पाडीत असत. ते म्हणत,

" आगगाडींत वेळ फुकट गेला तरी चालेल, पण, आपल्या कॉटेजमधील हवापाण्याच्या शरीरावर होणाऱ्या परिणामापुढें वेळाची ती काय किंमत ? शरीर उत्तम असेल तर इतर गोष्टी ! "

## बोरीबंदरवरील इंट्रोडक्शन

माईचें लग्न निव्वळ आईच्या हौसेखातर व आग्रहामुळें बाबांनीं इतक्या लवकर केलेलें होतें. त्यामुळें तिचा कांहीं मोठासा तोटा झाला होता अशांतला भाग नव्हे! पण आमचे बाबा उदार-मतवादी असल्यामुळें त्यांनीं निव्वळ आईच्या शब्दाचा मान राखण्या-करितां माईचें लग्न लवकर करून दिलें. तरी देखील ती एकंदरींत कल्चर्ड (सुसंस्कृत) व सर्वसाधारण लेखनवाचन, कशिदा काढणें, विणणें वगैरे कामकाजांत तरबेज बनली होती. दैवयोगानें तिला ठिकाणही उत्तम मिळाल्यामुळें तिचें सर्व यथास्थित होतें.

उन्हाळ्याची सुट्टी संपल्यामुळें भय्यासाहेब हे परत आपल्या गांवीं जाण्यास निघत असल्यामुळें आम्हीं मंडळी, म्हणजे मी व दादा, त्यांना पोंचवावयास बोरीबंदरवर गेलों होतों. बाबांना त्याच वेळीं एक व्हिजिट आली होती म्हणून ते लवकर स्टेशनवर आले नाहींत. पण साधल्यास तेही मागाहून स्टेशनवर येणार होते. आमची मंडळी नागपूर एक्सप्रेसनें जाणार होती. वास्तविक पाहतां त्यांना दुपारची मेलच जास्त सोईस्कर होती, पण सांताक्रुजहून मुंबईस येऊन भर दुपारीं उन्हांत किंवा पावसाच्या झोड लागली असतांना गाडी गांठणें त्रासाचें ठरवून मंडळीनीं एक्सप्रेसच जास्त पसंत केली.

एक्सप्रेस गाडी बोरीबंदरहून रात्रीं १०॥–११ ला कायशी निघत असे. आम्ही गाडीच्या अगोदर सुमारें तासभर येऊन आपापल्या जागा अडकवून ठेवणार होतों, कारण ह्या दिवसांत वऱ्हाड-नाग-पूरकडील परत जाणाऱ्या लोकांची विशेष गर्दी असल्याकारणानें गाडींत जागा मिळविणें कष्टाचें पडे. सेकंड क्लासमध्यें देखील कांहीं कांहीं वेळां जमिनीवरून (Floor) निजून जाण्याचे प्रसंग येतात असें भय्यासाहेब म्हणत. म्हणून आमची मंडळी आधींच

येऊन जागा अडविणार होती. त्याप्रमाणें आम्ही इंटरमध्यें आपली जागा तर मिळवलीच ! माई, मुलेंबाळें व भय्यासाहेबांचा गडी जागा धरून ठेवण्याकरितां डब्यांत बसून राहिलीं; आणि मी, दादा व भय्यासाहेब प्लॅटफॉर्मवर उगीच इकडून तिकडे व तिकडून इकडे येरझारा घालीत होतों.

गाडी सुटावयाची म्हणून मुद्दाम जरा जास्त दिवे लावण्यांत आले होते, विजेचे पंखेही सुरू करण्यांत आले होते. हमालांची ढकलगाडयांवरून सामान नेतांना धांवपळ चालली होती. रेल्वेच्या नोकरांची डब्यांवरून 'रिझर्व्हड्' किंवा अशींच इतर लेबलें अगर चिठ्ठया लावणें चालू होतें. कांहीं जण उगीच कसलीं तरी पावती-पुस्तकें घेऊन गडबडींत इकडून तिकडे धांवत होते. पण फॅशनेबल पार्शी मंडळी किंवा साहेब मंडळी आपापल्या स्त्रियांनिशीं झुलत डुलत व ऐटीनें असे व त्याचप्रमाणें एक प्रकारचा उसना निष्काळजीपणा आणून हिंडतांना दिसूं लागली नव्हती. थोडक्यांत सांगावयाचें तर गाडी सुटण्यापूर्वीचें ( Life ) किंवा चैतन्य अजून पुरेसें खेळूं लागलें नव्हतें, त्यास थोडा अवकाश होता... पण आपली दक्षिणी मंडळी मात्र आधींच येऊन आपापल्या जागा काबीज करून होती.

मी आमच्या मंडळींत हिंडत असतांनाच मला लांबून माझी बालमैत्रीण शकू ही आपल्या परिवारासह येतांना दिसली. अर्थातच मी आपल्या मंडळींतून फुटून जाऊन त्या परिवारांत समाविष्ट झालें. माझी मैत्रीण शकुंतला ही फार प्रेमळ स्वभावाची होती, त्या-मुळें तिचें माझें फारच सख्य होतें. आमच्यांत

"यूयं वयं वयं यूयमित्यासीन्मतिरावयो:"

असाच प्रकार होता; आणि अलीकडे दोन तीन वर्षे तिचें लग्न

झाल्यामुळें आमच्या गांठीभेटी (प्रत्यक्ष किंवा पत्रद्वारादेखील ) जरी क्वचित् होत तरी देखील

"किं जातमधुना येन यूयं यूयं वयं वयम्"

असें म्हणण्याची आमच्यावर पाळी आली नव्हती! माझ्या शकूचे यजमान नागपुरास बॅरिस्टरी करीत असत. ते अजून तरुण असल्यामुळें त्यांचा जम चांगला बसला नव्हता, तरी घरच्या सुस्थितीच्या जोरावर बॅरिस्टरी थाट करण्यांत त्यांची कमतरता नसे. बॅरिस्टरसाहेबांनीं यंदा पुण्यास बिऱ्हाड केलें होतें, व आतां ती मंडळी देखील नागपुरास परत चालली होती. शकूची व माझी अचानक गांठ पडल्याबद्दल सानंद आश्चर्य प्रकट करणें झाल्यावर व अशाच घरगुती चौकशा झाल्यावर साहजिकच मी आमच्य-मंडळीकडे परत आलें. आमच्या भैय्यासाहेबांची व शकूच्या यजा मानांची माझ्या व तिच्या आजपर्यंतच्या मैत्रीमुळें एकमेकांची एकमेकांस ऐकीव माहिती बरीच होती. शिवाय माईची शकूच्या माहेरीं चांगली ओळख असल्यामुळें ह्या मंडळीची त्या मंडळीशीं ओळख करून द्यावी असा माझ्या मनांत विचार आला, व त्याप्रमाणें मी शकूला तसें कळविलें देखील. तिच्या यजमानांनीं पण भय्यासाहेबांशीं आपली ओळख होण्याबद्दल थोडी उत्सुकता दर्शविली.

मी आमच्या मंडळींत परत आल्यावर अर्थात् इतका वेळ मी नाहींशी झाल्याबद्दल माझी बरीच थट्टा झाली. पण मी कांहीं कमी वस्ताद नसल्यामुळें कांहींचें 'डोळे फोडले' व कांहींस "चष्म्यावर चष्मा" चढविण्याची शक्कल सांगितली! कारण एवढ्या प्लॅटफॉर्म-वर हिंडतांना मी त्यांस दिसूंच नये म्हणजे खरोखर मानभावीपणा करणें होय. अर्थात् मी शकूची माहिती सांगितली व रा. भय्या-

साहेबांजवळ त्यांची इंट्रोडक्शन करून देण्याची गोष्ट काढली. दोघेही गृहस्थ एकाच प्रोफेशनचे म्हणजे एकाचा न्यायाकरितां भांडण्याचा तर दुसऱ्याचा न्यायमनसुबा करण्याचा असा व्यवसाय असल्यामुळें त्यांची एकमेकांची ओळख होणें इष्टच होतें. त्यांतले त्यांत शकूच्या यजमानांना भय्यासाहेबांच्या ओळखीची विशेष जरूर वाटणें साहजिक होतें.पण त्याबरोबरच भय्यासाहेबांना अम्मलदारी-पणाच्या बेपर्वाईनें पछाडलें असल्यामुळें त्या ओळखीबद्दल त्यांनीं अनुत्सुकता दाखवणें मला स्वाभाविक दिसलें. तरी शकू व माई यांची ओळख असल्यामुळें त्यांच्या यजमानांची ओळख झाल्यास बरें अशा विचारानें सहज हिंडतांनाच ज्या वेळीं आमची मंडळी समोरासमोर पण जवळ आली, त्या वेळीं मी इंग्रजी पद्धतीप्रमाणें त्या दोघांची इंट्रोडक्शन ऊर्फ परस्पर—परिचय करून दिला. ह्या परिचयाचे वेळीं भय्यासाहेबांनीं शकूचे यजमानांस पाहतांच मोठयानें हंसून मला म्हटलें, “हात्तिच्या! ह्यांचीच का आमच्याशीं ओळख करून देणार होतीस तूं ? वाहवा ! ह्यांची आमची तर पूर्वीच माथेरान-वर ओळख झालेली आहे. ” असें म्हणून व त्या मंडळीस नुसता नमस्कार देखील न करितां भय्यासाहेब पुढेंच निसटले.

हें त्यांचें मोठयानें खिदळून दिलेलें उत्तर ऐकून माझा अगदीं तिळपापड उडाला. मी केवढया उमेदीनें एक प्रकारचें सामाजिक (Social Work) कार्य करणार होतें. पण त्यांनीं माझ्या उमेदीचा व हौसेचा भंग करून माझ्या उल्हासी वृत्तीचा बेरंग करून टाकला. गृहस्थांची माथेरानला ओळख झाली होती म्हणे ! अस-तील एकाद्या हॉटेलच्या खोलींत एकत्र चारदोन दिवस राहत ! पण ती काय ओळख म्हणावयाची ! बरें जर यांची थोडीशी दाट

ओळख, अगर जरा जास्त संघटन झालें होतें अशी कल्पना केली, तर निदान शिष्टाचाराला अनुसरून तरी, त्या गृहस्थांना त्यांनीं नमस्कार चमत्कार तरी करावयास नको होता काय ?

परिचयाचा हा असा फार्स उडाल्यावर मी पुन: सहज एकदां बॅरिस्टरसाहेबांस भेटून त्यांची जरा माफी मागण्याचा प्रयत्न केला. कारण हा बोजवारा उडवून भय्यासाहेबांनीं माझा तर नुसता फजितवडा केला होता, एवढेंच नव्हे तर त्या गृहस्थांचा अपमान केला होता.

कांहीं वेळानें आगगाडी निघून गेली, आणि आम्ही म्हणजे दादा व मी, बाबांचा निरोप घेऊन चर्चगेट स्टेशनकडे निघालों. कारण आमच्या नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें आम्ही सांताक्रुजलाच जाणें अपरिहार्य होतें. ती वेळ फार उशीराची असल्याकारणानें आम्ही एक टॅक्सी करूनच बोरीबंदरावरून चर्चगेटला गेलों. नंतर तेथून आगगाडीनें सांताक्रुजला गेलों. पण वाटेंत मी अगदीं विचारांत गढून गेल्यें होतें. माझी नेहमींची विनोदी व बडबडी वृत्ति कोठें तरी पळाली होती. पण जात्याच थोडीशी सेंटिमेंटल असल्याकारणानें मला असे मनोभंग होण्याचा प्रसंग वरचेवर येत असत. तरी देखील आजचा प्रसंग मला विशेषच जाणवला. कारण आज मी होऊन माझ्या दृष्टीनें एक मोठी इष्ट गोष्ट जुळवून आणली; व ती सफल होणार इतक्यांत माझा जाणुनबुजून फजितवडा केला जावा, ही गोष्ट माझ्या मनाला तीव्रपणानें लागली. एवढयाच कारणानें आज आगगाडींतून जातांना मी जवळ जवळ मुग्ध होत्यें.

पण आमचा दादा मला थोडाच स्वस्थ बसूं देणार ! चर्चगेट जाऊन मरीन लाइन्स येण्याचा सुमार आला तेव्हां तो कसा

म्हणतो—" माई गेल्यामुळें एवढी उदास कां झालीस ? नेहमींची तुझी टकळी अगदीं बंद झाल्यामुळें मला तर आजचा हा प्रवास फारच कंटाळवाणा वाटत आहे. माई काय जायचीच...."

" होय, होय अस्संच ! माई गेल्यामुळेंच मी अशी खिन्न झाल्यें बरें का !"

अशा एक प्रकारच्या जोरांत माझ्या रागाचा बांध फुटून तो सैरावैरा पसरूं लागला. रागाला बाहेर पडावयास कांहीं तरी क्षुल्लक कारण व कोणी तरी बोलावयाला माणूस असलें कीं पुरे! आणि एवढी सामुग्री माझ्याजवळ असल्याकारणानें मी मग दादावरच घसरल्यें

" अग इतकी रागावलीस कां ? तुला एवढा राग तरी कसला आला? का आपली वाऱ्याबरोबरच भांडत सुटलीस? "

" होय वाऱ्याबरोबरच भांडणार बरं का! जशीं कांहीं भांडायला देखील माणसं मिळत नाहींत अगदीं, तेव्हां वाराच शोधून आणायला हवा! " असें म्हणून काय असेल तें असो, माझें मलाच ह्या कल्पनेबद्दल हंसूं यावयाला लागलें आणि असें वाटलें कीं काय छान उत्तर दिलें मीं.

माझी खिन्नता, त्याच्यामागून रागीटपणा व त्रासिकपणा आणि नंतर हास्य असे वरचेवर व क्षणोक्षणीं बदलणारे भाव पाहून दादा तर बिचारा थक्कच झाला. आणि याचा परिणाम म्हणून तो माझ्याकडे आश्चर्य करीत व स्वस्थ असा बराच वेळ पहात बसला. माझी हास्याची लहर ओसरल्यावर पुनः मी त्याच्या गंभीरपणावर संतापून म्हणाल्यें—" माझ्याकडे एवढा टक लावून काय पाहात राहिला आहेस? कां मला आज पहिल्यांदाच कोठें तरी पाहातो आहेस आणि माझ्या सौंदर्यावर भाळला आहेस......."

"काय पण सौंदर्य! अगदीं वायां चाललंय् आपलें सौंदर्य! ह्या कंपार्टमेंटभर उजेड पडला आहे तो आपल्याच सौंदर्याचा नाहीं का?"

"बरें बरें कळलं आपलें सौंदर्यपुराण!" मला पुनः राग आला. कारण खरोखरच मी साधारणपणें सुरेखांत गणल्या जाणाऱ्या मुलींत होत्यें. आणि अगदीं मनांतली गोष्ट सांगूच का मी? कॉलेजांत शिकणाऱ्या मुलींच्या सौंदर्याची प्रत अगर दर्जा त्यांच्याकडे नजर टाकणाऱ्या व त्यांच्या भोंवतीं गोंडा घालत फिरणाऱ्या तरुण विद्यार्थी आणि क्वचित् कांहीं प्रोफेसर यांच्या संख्येवरच अवलंबून आहे! ह्या परिसावर जर माझ्या सौंदर्य—सुवर्णाची पारख केली गेली असती तर आमच्या कॉलेजांतील मुलींत माझा दुसरा तिसरा नंबर खास लागता.

अशा प्रकारें थोडीशी धुसफूस झाल्यावर मी माझ्या रागावण्याचें व चिडण्याचें मुख्य कारण जें इंट्रोडक्शनचें, तें दादास सविस्तर समजावून सांगितलें. ही हकीगत सांगतांना तर, मला हुंदका येण्याची पाळी आली. पण, मी तो मोठ्या प्रयासानें व संयमनानें दाबून टाकला. कारण, पुनः आमच्या दादाचा व माझा, बायकांच्या रडकुंडीस येण्याच्या मनोदौर्बल्यावर कडाक्याचा वाद माजावयाचा! पण भय्यासाहेबांनीं जरी माझी पुरी फजीति केली तरी माझा पाठपुरावा करणारा माझा दादा तरी माझ्याबद्दल सहानुभूति दाखविणारा भेटला यामुळें मला फारच आनंद वाटला; व कविकुलगुरु कालिदास ह्याच्या

"स्निग्धजनसंविभक्तं हि दुःखं सह्यवेदनं भवति"

ह्या उक्तीचा पुरता पडताळा अनुभवास आला.

—रचनाकाळ, जून १९२९.

# बकुळीचीं फुलें

घणणण् . . . असा कॉलबेलचा आवाज ऐकूं आला. मी 'येस्' असें म्हणून आंत येण्याची परवानगी दिली. त्याबरोबर एक फॅशनेबलशी कॉलेजांतली तरुणी माझ्या खोलीच्या दारांत उभी राहिली. अर्थात् ती माझ्या माहितीची होती म्हणून मी तिचें आगत स्वागत केलें व एका कोंचावर तिला बसावयाची विनंति केली. ( बाकी कोणाही स्त्रीचें स्वागत करणें हें पुरुषाचें कर्तव्यच; म्हणून " ती माझ्या माहितीची होती म्हणून" हें म्हणणें मला शोभत नाहीं. पण एकदां लिहून झालेला मजकूर न खोडण्याचा खोडसाळपणा माझ्या अंगीं भरून राहिलेला असल्यामुळें मला हें एवढें विषयांतर करावें लागलें.

" हें आपलें ' विक्रमोर्वशीयम् ' घ्या. मला आपला निरोप पोंचला व म्हणूनच कॉलेजांतून जातां जातां हें पुस्तक देण्याकरितां मी आपणांकडे आल्यें, व तुम्हांला जरा तसदी दिली." हें म्हणतांना सहज एक हास्याची लकेर तिच्या तोंडावर आली. व ती या वेळीं फारच सुरेख दिसली.

"छे छे! त्यांत तसदी कसली? मी आपला रिकामटेकडेपणानें एक पुस्तक चाळीत होतों परवां. व त्या वेळीं मला त्यांतल्या एका श्लोकाची आठवण झाली. पुस्तक पाहण्याकरितां कपाटाशीं गेलों व नंतर तें मी तुम्हांला गेल्या वर्षी दिलें होतें अशी आठवण झाली! तेव्हां निरोप पाठवला. ." थोडा वेळ घुटमळून, " . . . शिवाय मला स्वतःला लोकांचें पुस्तक आपलें काम झाल्याबरोबर परत देण्याची संवय आहे, व लोकांनींही माझ्याशीं असेंच वागलें तर मला आवडतें." या वेळीं तिचा चेहरा जरा हिरमुसल्यासारखा झाला. माझें हें बोलणें जरा वर्मींच लागलें म्हणावयाचें.

ती चटकन् म्हणाली. "माझीच चूक झाली; मला तें याचे आधींच परत करावयास हवें होतें." तिनें पुस्तक टेबलावर ठेवलें.

"Oh! I am sorry! माझें बोलणें तुम्हाला झोंबलेलें दिसतें; पण मी आपलें अगदीं अन् कॉन्शसूली ( सहजगत्याच ) बोलून गेलों, बरं का?"

अशा परिस्थितींत ती आणखी फार वेळ माझ्या खोलींत थांबणें शक्यच नव्हतें. तिची इतक्या थोडया वेळांत बोळवण केल्याबद्दल किती तरी आधुनिक तरुण मला 'बावळा' म्हणतील. कारण अलीकडे कॉलेजांतून एकाद्या मुलीशीं एकादाच शब्द बोलण्याबद्दल केवढी खटपट चाललेली दिसून येते! तसेंच कोणा एकाद्या विद्यार्थ्याचें त्याच्याच ओळखीच्या एकाद्या विद्यार्थिनीशीं थोडें फार बोलणें सुरूं असलें तर त्या दोघांकडे कितीतरी जणांची हेवापूर्ण दृष्टि वळलेली असते! तरुणांच्या मनाची अशी प्रवृत्ति असल्यामुळें मला इतर तरुण बावळा ठरवतील. कारण, या वेळीं ती तरुणी माझ्याकडे आपण होऊनच आली होती, तिचें कॉलेज

नुकतेंच सुटलें होतें; तेव्हां चहाचा आग्रह करून तिच्याशीं निदान १५।२० मिनिटें तरी मला अगदीं सहजगत्या संभाषण करावयास मिळालें असतें.

ती जाऊन सुमारें तीन चार मिनिटें झाल्यावर मी पुस्तक हातांत घेतलें व माझ्या नेहमींच्या संवयीप्रमाणें तें तपासून पाहिलें. ( पुस्तकें लोकांस देतांना अगर लोकांकडून परत घेतांना तीं तपासून पाहण्याची पुष्कळ जणांप्रमाणेंच मला एक खोडी आहे. ) तेव्हां त्यांत मला कांहीं कागद किंवा प्रेमपत्र वगैरे कांहींच सांपडलें नाहीं, पण दोन पानांमध्यें वाळलेलीं अशीं बकुळीचीं कांहीं फुलें सांपडलीं. त्यांची एक लहानशी आंगठी बनवलेली होती. ह्या आंगठीची ती किंमत काय, साधारण प्रवृत्तीच्या मुलानें ती भिकार अशी एक वस्तु म्हणून वेस्टपेपर बास्केटमध्यें फेंकून दिली असती. पण मीं ती तशीच ठेवून त्या फुलांच्या मालकिणीनें जो एक प्रकारचा त्यांचा सन्मान केला होता तो कमी केला नाहीं.

* * *

चार पांच महिन्यानंतर एक दिवस माझी बहीण यमू तेंच पुस्तक चाळत होती. तिच्या मैत्रिणीनेंच तें तिच्याकडून वाचावयाला नेलेलें होतें. बकुळीच्या फुलांची आंगठी तिच्या दृष्टीस पडल्यावर ती मला म्हणाली—" दादा, ही आंगठी या पुस्तकांत कोठून आली रे? "

" कोठून म्हणजे, यायची तशीच आली."

" त्या आंगठीला काय पाय आहेत तर ती आपण होऊन तुझ्या पुस्तकांत येऊन बसली ? "

" तसेंच समज घटकाभर ! कारण मला तरी ती त्या पुस्तकांत कशी आली हें कोठें माहीत आहे ?"

" पण तुझ्या पुस्तकांना तुझ्यावांचून दुसरें तिसरें मनुष्या काय म्हणून हात लावील ?"

" तेंही खरेंच. ज्या अर्थी तूं मला बोलण्यांत आतां हटवलेंच आहेस; त्या अर्थी प्रथम मी तुझ्या उत्तम प्रकारच्या उलटतपासणी-बद्दल प्रशंसा करतों. आतां ती आंगठी पुस्तकांत कशी आली तें सांगतों बरं का बाईसाहेब ! त्या शशिकलेनें नव्हतें कां तुझ्याकडून माझें 'विक्रमोर्वशीयम्' नेलेलें ? तें तिनें जेव्हां परत आणून दिलें त्याच वेळीं मला ही आंगठी त्या पुस्तकांत आढळली."

" मग ती त्याच वेळीं तूं तिची तिला कां परत केली नाहींस ?"

" फार मौल्यवान्च कीं नाहीं ती आंगठी, तर तिची तिला परत केली पाहिजे ?"

" अरे, मौल्यवान नाहीं, तर मग तूं तरी ती एवढी जपून कां ठेवली आहेस ? कां संस्कृत नाटकांतल्या नायिकांप्रमाणें तिनें तुला ही आपल्या प्रेमाची खूण म्हणून नजर केली आहेन्.... "

या वाक्यावरून मी अगदीं चीत होऊन गेलों. ह्यावर ताबडतोब व समर्पक उत्तर न सुचल्यामुळें मी गोंधळून गेलों. आणि ह्या माझ्या मनस्थितीचा पूर्ण फायदा घेऊन यमूनें माझ्यावर निकराचा हल्ला केला. अर्थात् मी एकदां गोंधळून गप्प बसल्यामुळें तिची ही थट्टा बेताल होऊन तिनें माझ्या या आंगठी ठेवण्याच्या कृतीचा खरोखरच कांहीं निराळा अर्थ केला आहे कीं काय याची मला शंका येऊं लागली. ती मनापासून माझा व शशिकलेचा कांहीं प्रेम-संबंध जुळला आहे असें समजत होती, का तिनें नुसतें 'सुतानें स्वर्गाला जाऊन' ही थट्टा आरंभली होती, हें एक तिचें तिलाच

ठाऊक! पण मला त्या वेळीं तरी तिचा फार राग आला. कारण थट्टा तरी माणसानें किती सहन करावी ?

*　　*　　*

वरील प्रकारास देखील महिना दीड महिना होऊन गेला होता. पोस्टमन नुकताच आवारांतून बाहेर जातांना मी पाहिला होता, म्हणून तसाच टपालाच्या पेटींतून पत्रें काढून पाहूं लागलों, तों त्यांत यमूच्या नांवाची एक लग्नचिठ्ठी आढळली. तेव्हां सहज मी ती उघडून पाहिली तों काय आश्चर्य ! ती लग्नचिठ्ठी शशिकलेच्या लग्नाचीच निघाली. तेव्हां मग काय, माझ्या अंगीं एक निराळाच जोम येऊन मी ती चिठ्ठी घेऊन यमूच्या खोलींत गेलों व एका हातांत ती लग्नचिठ्ठी पुढें धरून हंसत हंसत तिला म्हणालों कसा, —" यमू, अग यमू, ही पाहिलीस कां आमच्या लग्नाची निमंत्रण पत्रिका ! "

" कोणाच्या म्हणालास, दादा ! " असें आश्चर्यचकित होऊन व डोळे मोठे करून ती म्हणाली.

" कोणाच्या म्हणजे ? शशिकलेच्या आणि.... एका माणसाच्या...." तिनें झटकन् धांवत येऊन माझ्या हातांतील पत्रिका हिसकून घेतलीन् व त्यावर झर्कन् नजर टाकून मग ती मला म्हणते कशी—

" एका माणसाशींच होणार आहे मुळीं तिचें लग्न, कांहीं एकाद्या बैलोबाशीं नव्हे ! "

त्या दिवशीं संध्याकाळीं बकुळीचीं फुलें पुस्तकांत ठेवण्याची कल्पना मुलींच्या डोक्यांत कां यावी यावर मी विचार करून पाहिला. मुलांच्या हॉबीज् किंवा आवडीनिवडी मला थोडयाशा माहीत होत्या, पण मुलींच्या

नव्हत्या. कॉलेजच्या आवारांत मुलें शिरलीं कीं त्यांच्यांत एका निराळया प्रकारच्या आवडीनिवडी सुरू होतात; पण निसर्गाची आवड स्त्रियांतच जास्त प्रमाणांत आढळते असें वाटतें. फुलांचे नाना तऱ्हेचे अलंकार पूर्वकालीं सर्वच स्त्रिया व अजून देखील पुष्कळ स्त्रिया वापरतात. अगदीं सुधारलेल्या पाश्चात्य देशांतील स्त्रिया देखील घराभोंवतालच्या बगीच्यांतून काम करून फुलें वाढवणें व पुष्पगुच्छ बनवून घर सुशोभित करणें यांत आनंद मानतात. आपल्याकडे फक्त शेवंती, गुलछबू, किंवा मोगऱ्याच्या फुलांची वेणी डोक्यांत घालणें, किंवा तें नच जमल्यास पानांसकट एखादेंच गुलाबाचें किंवा सोनचाफ्याचें फूल घालणें म्हणजे सौंदर्यवर्धन समजतात. पण ह्यापेक्षांही जास्त प्रमाणांत निसर्गाबद्दल प्रेम आपल्याकडच्या लोकांनीं दाखवावयास नको काय ? शशिकलेनें म्हणजे एका मुलीनें किंवा रे. टिळकांच्या ‘ शुष्क गुलाब ’ मधील ताईनें फुलांबद्दल जो एक आपलेपणा दाखवला होता त्याबद्दल त्यांचें कौतुक कां करूं नये ?

—रचनाकाळ सप्टेंबर १९२९.

# माझी आत्महत्या

वरील नांव वाचूनच वाचक एकदम पृच्छा करतील कीं "सद्‌-गृहस्थ, आपण आपल्या आत्महत्येची हकीगत आपल्या आत्महत्ये-नंतर हो कशी आम्हांस सांगणार? कां आपला मृत आत्मा आपली एखादी प्रिय पत्नी असल्यास तिला भेट द्यावयास प्लँचेटमधून येऊन नंतर तद्वारा आपण आपली हकीगत सांगत आहांत? प्लँचेट यंत्राचे प्रसारक, रा.ऋषि हे आपल्या मृत अशा पत्नीची भेट ह्याच प्लँचेटच्या साह्यानें घेत असतात व तिजशीं संभाषण करीत असतात ही गोष्ट बऱ्याच मंडळींना अवगत असेल. त्याच्याच उलट आपणही कदाचित् आपल्या प्रिय पत्नीच्या द्वारां आपल्या आत्महत्येची अप्रिय हकीगत आपल्या मराठी भाषा बोलणाऱ्या बंधूंस कळविण्याची तसदी घेत असाल नाहीं? "

हा प्रश्नांचा भडिमार ऐकून मी तर बिचारा घाबरून गेलों आहें. मी स्वत: जिवंत आहें, ही गोष्ट प्रथम सांगून टाकतों. त्याचप्रमाणें मी एकदां आत्महत्या करण्याचा पक्का निश्चय करून व त्या फंदांत

पडून नंतर तितका धीर न झाल्याकारणानें त्या भानगडींतून सही-सलामत परत आलेला असा एक दुर्दैवी प्राणी आहें.

प्रस्ताव बराच लांबला. सन १९२८ सालांतील मे महिन्याच्या १५ तारखेचा सुमार असेल. मी, माझी चुलत बहीण व इतर कांहीं समवयस्क मित्रमंडळी नुकत्याच घडलेल्या लो. टिळक यांच्या चिरंजिवांच्या(श्री.श्रीधरपंत ऊर्फ बापूराव टिळक यांच्या) आत्महत्येबद्दल गप्पा मारीत होतों. त्या संबंधांत त्या वेळीं पुण्यांत 'टिळक बंधू आणि केसरी ट्रस्टी' यांपैकीं कोणची तरी एक बाजू घेऊन उगाच वाद करण्याची टूम निघाली होती. असल्या वादविवादांत एक प्रकारचें मनोरंजन जरी असलें, व वादविवादांत भाग घेणारी मंडळी वर्दळीवर येऊन जरी त्या वादविवादास रंग चढवीत असली तरी देखील असल्या वादांत कोणत्याही पक्षाचा तादृश फायदा कोणताच नसतो; उलट ह्या मंडळीस 'लोकांच्या उगाच कुटाळक्या करणारी मंडळी' असें बडें नामाभिधान प्राप्त होत असतें. आतां प्रस्तुतच्या ह्या कै. बापूरावांच्या आत्महत्येबद्दलची चर्चा तरी निव्वळ कुटाळक्या या सदरांत येत नव्हती. पण आमच्यांत जो वादविवाद चालला होता 'तो कोणच्याही व्यक्तीवर खरोखर आत्महत्या करावयास प्रवृत्त होण्यासारखे प्रसंगच येतात किंवा नाहीं' अगर आत्महत्या करणारी व्यक्ति कोणच्या मन:प्रवृत्तीची असेल, व त्या व्यक्तीस कोणच्या कारणांमुळें आत्महत्या करावयाची अंत:स्फूर्ति होत असेल, वगैरे तात्त्विक विषयांवर एक प्रकारच्या गंभीर स्वरूपाचा होता. त्या वादविवादांत, "आत्महत्या करणारी मंडळी नुसती वेडपी, चटकन डोक्यांत राख घालून घेऊन " मोडूनि दंडा फेंकुनि देईन भिकार सगळीं वस्त्रें ऽऽऽऽ......" अशा प्रकारचा त्रागा

करणारी असावी" वगैरे प्रकारची बडबड मी स्वत: केली होती व ह्या आत्महत्या करणाऱ्या लोकांची एक प्रकारें टरच मी उडवीत होतों. पण मजवर कांहीं प्रसंग येऊन पुढें सुमारें दोन महिन्यांत मीच जेव्हां आत्महत्या करण्यास प्रवृत्त झालों तेव्हां मला माझ्या बोलण्याची आठवण होऊन त्या माझ्या भापणाबद्दल मी सर्व आत्म-हत्या केलेल्या लोकांची, मनापासून पण मनांतल्या मनांतच, माफी मागितली होती. तसेंच मला पूर्वी वाटत असे त्याप्रमाणें,ज्या कांहीं इतर मंडळींस आत्महत्या करणाऱ्या मंडळीबद्दल एक प्रकारचा अनादर वाटत असेल त्यांस तो तसा न वाटावा,ह्या इच्छेनें मी माझी हकीगत नीट व काळजीपूर्वक वाचण्याचा लोकांस आग्रह करीत आहें.

जूनच्या ५ तारखेस आमच्या इंटरमीजिएट परीक्षेचा निकाल लागला. आधींच इंटरची परीक्षा फार कडक, त्यांत यंदा तर एकं-दर पुणें सेंटरचाच निकाल फार वाईट लागलेला. तेव्हां आमचा कसा काय लागेल याची आम्हांस काळजी वाटत होती. आमच्या घरांतून मी व माझी चुलत बहीण अशी दोघेजण परीक्षेस बसलों होतों. ती चांगल्या तऱ्हेनें पास झाली व मी.....नापास झालों!

माझे वडील बेळगांवास वकील असत. पण, १९२० च्या असहकारितेच्या चळवळींत त्यांनीं कर्नाटकस्थ पुढारी दे. भ. गंगाधरराव देशपांडे, दे. भ. कौजलगी वगैरेंच्या अनुकरणास्तव वकिली सोडली होती. पण, त्यापूर्वींच त्यांनीं थोडीशी इस्टेट केलेली असल्यामुळें आम्हांस खाण्यापिण्याची व कपडयालत्त्यांची ददात नव्हती. शिवाय आमच्या कुटुंबाचा विस्तार फारसा नव्हता. त्याच चळवळींत मला देखील वडिलांनीं शाळेंतून काढला होता. ह्या चळवळीमुळें शिक्षणांत मी दोन वर्षे मागें राहिलों. १९२२ त

माझे वडील वारल्यामुळें, व आई त्यापूर्वींच मरण पावलेली असल्या-मुळें माझे चुलत्यांकडे पुण्यास मी राहावयास आलों. माझे चुलते आतां माझे पालनकर्ते झाले होते, व तेच माझ्या १०।१२ हजा-रांच्या इस्टेटीची व्यवस्था पाहूं लागले. मला चुलत्यांनींच पुनः मॅट्रिकच्या वर्गांत घातलें. त्या वेळीं काकांची मालती ही हुजूरपागेंत मॅट्रिकच्याच वर्गांत जात असे. तिच्या माझ्या वयांत २–२॥ वर्षांचा फरक होता. तिचें व माझें शिक्षण कथानकाच्या कालापर्यंत बरो-बरीनें चाललें होतें.

मॅट्रिकच्या परीक्षेपासून तिची व माझी तुलना घरांत व इतरत्र बाहेर देखील होऊं लागली. युनिव्हर्सिटीच्या परीक्षेपूर्वीं आमच्या शाळा निराळ्या, पेपर निराळे, सर्वच निराळें! पण, युनिव्हर्सि-टीच्या परीक्षेपासून सर्वच बदललें. तेव्हांपासून आमच्या हुपारीची तुलना होऊं लागली, व ज्याचा नंबर वर जाई त्याची स्तुति होऊन दुसऱ्याची मानखंडना होऊं लागली. पुरुष विद्यार्थी आतां मनांत चटकन् म्हणतील कीं मालतीचीच वारंवार स्तुति होत असेल. कारण त्यांची अशी पक्की व ठाम समजूत असते कीं, कॉलेजांतले प्रोफेसर स्त्रीदाक्षिण्याचे पूर्ण चहाते असल्यामुळें ते त्यांच्या या नैसर्गिक प्रवृत्तीमुळें स्त्री विद्यार्थ्यांस पुरुष विद्यार्थ्यांपेक्षां जास्त सव-लती देतात व परीक्षेंत त्यांस जास्त मार्क देतात. कांहीं कांहीं फारच वात्रट विद्यार्थी ( किंवा ज्यांच्या जिभेला हाडच नसतें असे विद्यार्थी ) इतकें पुढें जाऊन म्हणतात कीं, सुस्वरूप अशा स्त्री-विद्यार्थिनीलाच त्यांतल्या त्यांत जास्त मार्क, अशा स्त्रीदाक्षिण्यवादी प्रोफेसरांकडून मिळतात . . . . . . . तें असो. माझ्या म्हणण्याचा थोडक्यांत अर्थ, कधीं मालतीस माझ्याहून जास्त मार्क पडत तर

कधींकधीं मलाही तिच्यापेक्षां जास्त मार्क पडत असत. मॅट्रिक्यु-लेशनच्या परीक्षेंत आम्हां दोघांनाही शेंकडा ५५ वर मार्क असून मला तिच्यापेक्षां जवळजवळ २०।२५ मार्क जास्त होते. पण, कॉलेजच्या फर्स्ट इयरच्या परीक्षेंत आम्ही दोघे दुसऱ्या वर्गांत पास होऊन तिला माझ्यापेक्षां १५ मार्क जास्त पडले. इंटरमीजि-एटच्या सहामाही परीक्षेंत आमच्यांत सारें ३ च मार्कांचें अंतर होतें! माझा इंग्रजी विषय तिच्यापेक्षां जरा बरा होता. तरीही इंटरच्या वार्षिक परीक्षेंत मी इंग्रजींतच नापास होऊन परीक्षा नापास झालों. तिला आमच्या अपेक्षेप्रमाणेंच सर्व विषयांत मार्क पडून ती २ ऱ्या वर्गांत पास झाली. मालतीला ती पास झाल्याबद्दल आनंद वाटण्या-ऐवजीं मी नापास झाल्याबद्दल दुःख झालें ! याचें कारण दुसरें तिसरें कांहीं नसून आम्ही बरोबरच घरांत अभ्यास करीत अस-ल्यानें तिला माझ्या हुषारीची यथार्थ कल्पना होती. मला थोडें-फार वाईट वाटलेंच; त्यांत नवल काणतें ? पण, इतरेजनांस हर्ष झाला, व गप्पा मारण्यास विषय झाला ! " अहो तो कसला शिक-तोय् ! नॉन को-ऑपरेशन केलेला उडाणटप्पू तो. आतांपर्यंत पास कसा झाला याचेंच नवल ! " अशा प्रकारचे बोल माझ्या कानीं पडूं लागले.

घरांतील इतर बहुतेक मंडळी देखील, माझी पूर्वीची विद्यार्थी ह्या नात्यानें असणारी योग्यता विसरले, तर बाहेरच्या लोकांची काय कथा ! या परीक्षेच्या निकालानंतर घरांतील लहान लहान चुलत भांवडेंदेखील माझा पूर्वीसारखा मान ठेवीनाशीं झालीं. पण यांत त्यांना तरी काय दोष द्यावयाचा ? कारण लहान मुलांची एकंदर वागण्याबाबत असलेली साहजिक प्रवृत्ति म्हणजे वडील

माणसांची 'री' ओढणें होय. तेव्हां काका–काकूंच्या माझ्याशीं वागण्याच्या तऱ्हेचेंच प्रतिबिंब जर लहान व अजाण अशा मुलांच्या वागणुकींत आढळलें, तर त्यांत नवल कोणतें ?

जूनच्या पांचव्या तारखेस संध्याकाळीं ७ चे सुमारास आमचा निकाल लागला. अर्थात् मालती पास झाल्याबद्दल पेढे त्याच दिवशीं वाटावयाचे; पण काय असेल तें असो, तो समारंभ दुसऱ्या दिवशीं सकाळपर्यंत पुढें ढकलला गेला. घरचा बाजार मीच करीत असल्या-मुळें पेढे मलाच आणावे लागले. ते विकत घेतांना व घरीं आणीत असतांना माझ्या मनाला किती घरें पडलीं असतील तें वाचक जाणतीलच. आदल्या सबंध रात्रींत माझा डोळयाला डोळा लागला नव्हता, कारण डोकें विचारांनीं भणाणून गेलेलें होतें.पोरकेपणामुळें व प्रौढ वयामुळें मी नापास होणें हें अयोग्य होतें. आणि वास्तविक मी नापास होणाऱ्यांपैकीं तर नव्हतोंच, पण कदाचित् दुसऱ्याही वर्गांत पास होणाऱ्या चांगल्या विद्यार्थ्यांपैकीं एक होतों. म्हणूनच माझें नापास होणें मला सहन होईना.

परीक्षेच्या निकालानंतर दुसऱ्याच दिवशीं मालतीच्या आजोळीं पेढे पोंचविण्याचें काम माझ्याचकडे आलें. मी आळंटळं करूं लागलों, तेव्हां काकू म्हणाल्या—"मालू आत्तांच न्हाली आहे, तेव्हां मोकळे केस घेऊन ती कशी जाईल रे पेढे द्यावयास ? खरोखर म्हणजे तिनेंच पेढे द्यावयास जावयाचें, आणि तेंही कालच्या काल. पण आतां जास्त उशीर नको. तूंच घेऊन जा कसा आत्तां...."

यावर कांहीं अपीलच उरलें नाहीं. मी पेढे घेऊन गेल्यावर मालतीच्या मामांनीं मला मुद्दाम अगदीं आपल्याजवळ बैठकीवर बसवून घेऊन चहापाण्याचा आग्रह केला. ते नेहमींच तसें करीत

असत, म्हणून मला त्यांत विशेष कांहीं वाटलें नाहीं. पण पुढें चहा पितांना व नंतर मी जो थोडा वेळ त्यांच्या जवळ बसलों होतों त्या वेळांत त्यांनीं मालूची फारच स्तुति करून घेतली व उलट माझी प्रच्छन्नपणानें फार टर उडवली...आणि हें सर्व करीत असतांना त्यांच्याच समोर बसलेल्या त्यांच्या तीनचार पक्षकारांची त्यांस यत्किंचित् देखील आठवण राहिली नाहीं. नेहमींच्या शिरस्त्या-प्रमाणें म्हणजे सकाळीं, मामांस एक मिनिट देखील बोलावयास फुरसत नसावयाची पण आज तेच मामासाहेब पक्षकारांपाशीं आपल्या भाचीच्या हुषारीची तारीफ करीत राहिले.

मला घराबाहेर न जातां स्वतःचें तोंड घरांतच दडवणें केवळ अशक्य होतें. परीक्षा नापास होणें म्हणजे खरोखरीच एवढी काळिमा आणण्यासारखी वाईट गोष्ट नव्हे; ह्याच कारणास्तव मी भीडभाड सोडून बाहेर जाण्याचा व जगांत मिसळण्याचा प्रयत्न करीत असें. पण मला वाटतें तें आपलें अळेंबळेंच आणलेलें धैर्य असावें, व खरोखरच माझ्या चर्येवर कांहीं तरी निराळा फेरबदल झालेला असावा.

एक दिवस सकाळीं आमच्या वर्गांतील एक उडाणटप्पू पण पास झालेला विद्यार्थी भेटला. रस्त्यांत 'हस्तिदंती' झाल्यावर त्यानें मला मुद्दाम थांबवून म्हटलें—

"तुम्ही म्हणे इंग्रजींत नापास झाला! बाकी यंदा इंग्रजीचे सर्व पुणें सेंटरचेच पेपर फार कडक तपासले. आला असेल त्यांत तुमचा नंबर झालें! बाकी आम्ही बरे सुटलों म्हणा-वयाचे. . . ." यावर कांहीं तरी तात्पुरतें उत्तर देऊन मी पुढें निसटलों. ह्राच विद्यार्थी आमच्या घरीं मालतीच्या व माझ्या नोट्स् मागण्या-

करितां आमच्याकडे वारंवार हेलपाटे घालीत असे. पण त्याच्या भाषणांत सहानुभूतीचा ओलावा असेल तर शपथ!

असे खट्टू होण्याचे प्रसंग वरचेवर येऊं लागले.एका पंधरवड्यांत मला जीव नकोसा वाटूं लागला. नुसताच परीक्षा नापास होण्याचा प्रसंग मजवर येता तर त्यांत एवढें कांहीं बिघडत नव्हतें; पण धाकटी बहीण पास व मी नापास हा त्यांत विशेष होता. म्हणूनच माझी मानखंडना जास्त होई,व ती जवळ जवळ अनाठायींच असल्या-मुळें मला त्यामुळें अत्यंत तीव्र मन:संताप होऊं लागला.

ह्याच पंधरवड्यांत सहानुभूति दर्शविणारे असे दोनच प्रसंग घडले, व ते म्हणजे माझ्या दोन गुरुजींच्या भेटीचे. ह्या दोन्ही प्रोफेसरांना दोन वर्षांच्या अनुभवानें माझ्याबद्दल थोडें प्रेम वाटत असे. त्यानीं मला धीर देऊन पुन: परीक्षेस बसण्याचा आग्रह केला. असले नापास होण्याचे प्रसंग कधीं कधीं हुशार विद्यार्थ्यांवरही कम-नशिबानें ओढवतात. पण त्यामुळें विचारी माणसानें डगमगून न जातां दुप्पट उत्साहानें अभ्यास करून यश कमावण्याचा प्रयत्न केला पाहिजे असे धीराचे व सहानुभूतिपूर्ण उद्‌गार त्यांनीं मजजवळ काढले होते.

मानखंडना होण्याचा असा प्रसंग पूर्वी कधींही न आल्याकारणानें मला वरचेवर होणारा हा अपमान दु:सह होऊं लागला. तसेंच त्याच वेळेला परीक्षेंतील अपयशामुळेंच आत्महत्या केलेलीं दोन तीन उदाहरणें कानावर आलीं. श्रीयुत बापूराव टिळकांचें उदाहरण देखील ताजेंच होतें. मला जगांत कुठलाच पाश नव्हता. उलट मज-करितां विशेष वाईट वाटून घेऊन रडणारें, अगर माझ्या मृत्यूमुळें कायमचें नुकसान होणारें असें एकही चिटपाखरूं या उभ्या पृथ्वीवर

नसल्यामुळें माझें मन साहजिकच या अपमानांतून कायमची सुटका करून घेण्याकडे म्हणजे आत्महत्या करण्याकडे धांवूं लागलें.

हा आत्महत्या करण्याचा बेत बदलणें भोंवतालची परिस्थिति बदलली असती तरच शक्य होतें. पण भोंवतालची परिस्थिति काय म्हणून बदलावी ? निदान तीन चार महिने तरी ती तशी कायम राहणें अपरिहार्य होतें. पण माझ्या मानी स्वभावाला एका पंधरवड्याचें जिणें नकोसें वाटूं लागलें होतें,तेव्हां जास्त दिवस जगावयाचें तरी कसें?

आजूबाजूची परिस्थिति बदलावी, व झालेल्या दुःखाचा थोडा विसर पडावा म्हणून मी कांहीं दिवसांकरितां काकांची परवानगी घेऊन मुंबईस एका नातलगांकडे राहावयास गेलों. तेथें सुमारें आठ-वडाभर राहून मी परत पुण्यास येईन असें काकांस सांगितलें. त्या प्रमाणें मी मुंबईस या नातलगांकडे राहावयास गेलों. पण तेथें देखील अगदीं क्षुल्लक प्रकारच्या कां होईना पण डागण्या माझ्या दुःखावर मिळूं लागल्या. मुंबईतील आमच्या ओळखीची बहुतेक मंडळी भेटली म्हणजे साहजिकच परीक्षेचा प्रश्न उपस्थित होई व त्यामुळें माझ्या मनाचा कल आत्महत्या करण्यापासून दूर होण्याऐवजीं उलट तो तिकडेच वेगानें जाऊं लागला.

ही आत्महत्या करण्याची कल्पना जेव्हां प्रथम माझ्या डोक्यांत आली तेव्हांपासून ती कोठें व कशी करावी याचा विचार देखील मला न कळत माझें मन करीत होतें. आत्महत्या करण्याचे निरनिराळे प्रकार मी मनांत आणी व त्या प्रत्येकांत कांहीं तरी वैगुण्य मला आढळेच. श्री. बापूरावांचें अनुकरण करावें असें देखील मला वाटे, पण तें फारच धाडसाचें काम!

माझा बेत तर कायम झाला, पण मार्ग अजूनपर्यंत निश्चित

झाला नव्हता. मुंबई नगरी मला फार पसंत पडली. आणि त्यांत हा पावसाळ्याचा समय समुद्रांत जीव देण्यास अत्यंत सोईस्कर! मी पूर्वी यू. टी. सी. मध्यें असतांना २७ सालीं आमचा कँप सांताक्रुझला बसला होता. तेव्हां दररोज सकाळीं आम्हांस समुद्रस्नानास धांवडत नेत असत. मुंबईची चौपाटी अगर बॅकबे ही जीव देण्यास अत्यंत धोक्याची जागा. भररात्रीं देखील जीव देण्याची तेथें गैरसोय. आपोलो बंदर वगैरे जागा देखील तशाच. तेव्हां मनुष्यवस्तीपासून फार दूर असा माझ्या माहितीचा समुद्रकिनारा म्हणजे सांताक्रुझ जवळचाच बीच. मला पोहतां येत नव्हतेंच, म्हणून ही कल्पना मला फार आवडली.

जागा तर मुक्रर झाली. तेव्हां तिचें पुनः एकदां नीट निरीक्षण करावें म्हणून मी एक दिवस दुपारीं तेथपर्यंत जाऊन आलों, व त्या दिवसापासून तिसऱ्या दिवशीं कृष्णपक्षांतील एकादशी येत असल्यामुळें मी तो दिवस पक्का केला. दरम्यानचा काळ त्या रात्रीं बाहेर जाण्याकरितां सबब कोणची काढावी, आत्महत्येबद्दलची बातमी इतरांस कशी कळवावी व त्यामुळें इतरांस कोणताही त्रास कसा पोंचू नये, आपल्या सुमारें १०।१२ हजार रुपयांची व्यवस्था काय लावावी वगैरेंचा विचार करण्यांत मी घालविला.

आत्महत्येचा दिवस उजाडला, तो मध्यावर आला व मावळला देखील. आमचीं जेवणींखाणीं आटोपलीं, व त्यानंतर थोडया गप्पा झाल्यावर मी घरच्या यजमानांस " एका मित्राकडे सहज जाऊन येतों. कदाचित् सिनेमास गेल्यास घरीं परत येणार नाहीं; तेव्हां वाट पहात राहूं नका " असें सांगण्यास विसरलों नाहीं. बाहेर जाण्यापूर्वी माझ्या सूटकेसमध्यें ( ती उघडीच ठेवून ) अगदीं वर दिसतील

असे दोन लिफाफे आंत पत्रें लिहून व बंद करून असे ठेवले. एकावर काकांचा पत्ता व दुसऱ्यावर मालतीचा पत्ता होता. काकांच्या पत्रांत मृत्युपत्र ठेवलें व मालतीच्या पत्रांत मी आत्महत्या करण्यास कां प्रवृत्त झालों याची थोडक्यांत हकीगत लिहिली होती. इस्टेटीची पुष्कळशी रक्कम धर्मादाय करावी अशी माझी इच्छा होती व कांहीं अंश मी मालतीकरितां शिल्लक ठेवला होता. तिच्या बरोबरच्या माझ्या सहवासामुळें व तिच्या स्वभावानें देखील ती मला आवडत असे. त्याचप्रमाणें इतरांकडून कितीही अपमान झाला तरी तिच्या-कडून मला नेहमीं सहानुभूतिच मिळत गेली होती. हीही एक गोष्ट मी तिला कांहीं अंश ठेवण्यास कारणीभूत झाली असेल.

घरून निघून मी चर्नीरोड गांठलें. तेथें सांताक्रुझचें तिकीट काढलें, व खूप उशीराच्या एका लोकलनें सांताक्रुझला पोंचलों. ती वेळ १२–१२॥ ची असावी, म्हणून आणखी कांहीं वेळ उगाच भटकून नंतर मी समुद्राकडच्या बाजूस जाऊं लागलों. सुमारें निम्मा रस्ता वस्तीमधूनच होता. तेथून जातांना विशेष जोराचें असें आंदो-लन मनांत चालू नव्हतें. पण रस्त्याचा उत्तरार्ध सुरू झाल्याबरोबर आत्महत्या करावी कीं न करावी असे विचार पुनः पुनः मनांत येऊं लागले. नभोमंडळ अभ्राच्छादित होतें, त्यामुळें वातावरण काळें कुट्ट होतें. तरी देखील जणूं काय मला धीर देण्याकरितांच म्हणून वायरलेस स्टेशनचे उंचच उंच खांब खडे होते. एक मन आतां म्हणूं लागलें "आत्महत्या करणें हा भ्याडपणाचा मार्ग आहे. पुनः परीक्षेचा अभ्यास करावा व उज्ज्वल यश संपादून लोकांच्या तोंडून आश्चर्योद्‌गार काढावे." दुसरा विचार येई– "हें जग सज्जनांकरितां किंवा भल्यांकरितां नाहींच; त्यांत वाटेल त्या योग्य

अयोग्य माणसानें पुढें यावें. जगांत गुणाला किंमत आहेच अशी खात्री नाहीं. तेव्हां उगीच वरवर भुलवणाऱ्या जगांत राहून जास्त शोभा करून घेण्यांत काय अर्थ आहे ?"

समुद्र किनाऱ्याच्या अलीकडील नारळाच्या झाडांची गर्द झाडी जवळ आली, लाटांची गंभीर गर्जना स्पष्टपणें कानावर आदळूं लागली. रस्ता अगदीं पायाखालचा नसल्यानें चालतांना अडखळून पडण्याची भीति वाटूं लागली. आणि जसजसें आत्महत्या करण्याचें ठिकाण (प्रत्यक्ष समुद्र) जवळ जवळ येऊं लागलें, तसतशी आत्म-हत्या करण्याबद्दल भीति वाटूं लागली. आत्महत्या करण्याचा विचार सोडून पुनः 'जगावें' असेंच आतां अधिकाधिक वाटूं लागलें, ह्या वेळेस 'जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे' वगैरे म्हणी आठवूं लागल्या. आत्महत्या करणें ही कांहीं सोपी व वाटेल त्याला साधेल अशी गोष्ट नव्हे ही प्रचीति आली. आत्महत्येचा विचार करणें व बेत करणें हें निराळें व प्रत्यक्ष हत्या करणें हें अगदींच निराळें !

कसाबसा मी समुद्रकिनारा गांठला. तेथेंच वाळूवर बसून मी त्या सागराचें रौद्र व भयानक स्वरूप बघूं लागलों. लांब अंतरावर समुद्र-किनाऱ्याकिनाऱ्यानें वस्ती आहे त्या बंगल्यांमधून क्वचित् विजेच्या दिव्यांचा प्रकाश दिसत होता. त्याशिवाय मनुष्यमात्राच्या अस्ति-त्वाची खूण देखील नव्हती. एकादा तासभर मी तेथेंच विचार करीत बसलों असेन. 'जीव द्यावा कीं न द्यावा' 'जगावें कीं मरावें' याचा काथ्याकूट हॅम्लेटप्रमाणें मी करीत बसलों. हॅम्लेटपुढें जगण्याकरितां कांहीं विशेष काम—म्हणजे बापाच्या खुनाचा सूड घेणें हें काम होतें. पण माझ्यापुढें विशिष्ट ध्येय कांहींच नव्हतें. माझा कल 'मरावें'कडे झुकावा; पण आत्महत्या करण्यास लागणारा मनाचा खंबीरपणा

माझ्यांत नव्हता. मी मृत्यूस कवटाळण्यास सिद्ध झालों होतों; पण तो प्रत्यक्ष पुढें दिसतांच त्यास घाबरलों व त्यापासून पळून जावें असें वाटूं लागलें.

पहांटेपर्यंतचा काल मी कसा घालविला तो मला आतां कांहीं आठवत नाहीं. मी स्टेशनवरून सकाळीं गिरगांवांत घरीं आलों. आल्या-बरोबर पहिल्या प्रथम इतरांच्या न कळत सूटकेसमधील पत्रें मी हस्तगत करून घेतलीं व कोटाच्या आंतल्या खिशांत तीं दडवलीं. पुण्यास दुपारच्या मेलनें परत जाण्याचा बेत केला व त्याप्रमाणें घरच्या मंडळींस सांगितलें. दुपारीं खंडाळ्याच्या घाटांतील एका खोल दरींत माझ्या दोन्ही पत्रांचे अगदीं बारीक बारीक तुकडे करून ते फेंकून दिले ! दिव्यावर तीं पत्रें जाळण्याचा किंवा चुलींत टाकण्याचा विचार सोडून दिला, न जाणो ! कोणी पाहील, विचारील, ही भीति होती.

आत्महत्येचा माझा बेत कुणासच कळला नाहीं. मला मात्र त्या बेताची चांगलीच आठवण कायम राहिली. पुढें थोडक्याच दिवसांनीं George Eliot या प्रसिद्ध लेखिकेची Adam Bede ही कादंबरी वाचीत असतांना Hetty या नायिकेची हकीगत वाचतांना मला माझ्या भ्याडपणाची आठवण झाली. Hettyचें एका श्रीमान् जहागिरदारा-वर प्रेम असतें. त्या प्रेमसंबंधामुळें ती कुमारिका असतांनाच तिला मातृपद प्राप्त होण्याची स्थिति येते. जहागिरदारास ह्या गोष्टीचा (म्हणजे हेटी लवकरच बाळंत होईल व आपल्या प्रेमसंबंधाचा स्फोट होईल.) सुगावा लागतांच तो लंडनला पळून गेलेला असतो. हेटी त्याचा शोध करण्याकरितां लंडनला जाते व खूप भटकते. तिचे पैसे संपतात. लंडनहून परत आपल्या गांवीं येतांना एका खेडेगांवीं ती

आत्महत्या करण्याचा प्रयत्न करते. दाट रानांतल्या एका तळ्याच्या कांठीं ती जाते व श्रमानें व्याकुळ होऊन बराच वेळ बेशुद्ध पडते. शुद्धि आल्यावर आणि आपलें शरीर जसेंच्या तसेंच सुरक्षित पाहिल्यावर त्या अशक्त व रोड देहावर ती आपलें प्रेम व्यक्त करते. ती आनंदाच्या भरांत बेभान होऊन आपल्याच हातापायांचे पटापट मुके घेते. ( " The very consciousness of her own limbs was a delight to her; she turned up her sleeves, and kissed her arms with the Passionate love of life. ")

माझ्या अपकीर्तीपेक्षां हेटीची केवढी मोठी अपकीर्ति होणार होती. पण तिला ज्याप्रमाणें आपल्या नश्वर देहाबद्दल प्रीति वाटली व तो सोडवला नाहीं, त्याप्रमाणें मला देखील माझें शरीर व आयुष्य मौल्यवान् वाटलें.

हेटीचें पुढचें आयुष्य अत्यंत दुःखद प्रकारच्या परिस्थितींत गेलें; पण माझें तसें कांहींच झालें नाहीं. दुसऱ्याच वर्षी मला चांगल्या प्रकारें परीक्षेंत यश मिळालें व माझी नातेवाईक मंडळी आतां मला पुन्हा हुशार म्हणूं लागली! पण एकादशीच्या दिवशीं मृत्यु न आल्यानें भाविक लोकांचे दृष्टीनें मी पापीच ठरलों !

—रचनाकाळ आक्टोबर, १९२९.

# पत्राबद्दल वाटणारा आनंद

आनंद अगर सौख्य मिळण्याकरितां तर सर्व जीवमात्रांची धडपड ! कोणाला फार दिवसांनीं भेटलेल्या मित्राबद्दल, तर विद्यार्थ्यांना परीक्षा पास झाल्याबद्दल, संसारपथावर नुकतेंच पाऊल टाकणाऱ्या पुरुषास अगर स्त्रीस गडकऱ्यांच्या भावबंधनांत वर्णन केलेल्या पांच विरहांपैकीं कोणच्याही विरहानंतर होणाऱ्या भेटींत, वर्डस्वर्थ सारख्या निसर्गाच्या रम्यदर्शनांत रममाण होऊन जाणाऱ्या कवीस एखाद्या "डॅफोडिल" जातीच्या फुलांसारख्या दृश्यांत, म्हाताऱ्या आजोबांना नातवाच्या बाललीलांत, अगर अजाण अशा ५।६ महिन्यांच्या अर्भकास पाळण्यांत वरच्या बाजूस टांगलेल्या चिमण्या-मोरांकडे पाहून ( अगर कोणत्या कारणांमुळें तें कोणी सांगावें !! ) ज्या प्रकारचा उत्कृष्ट आनंद लाभतो तसलाच आनंद मला एके दिवशीं टपालांतून माझ्या नांवच्या आलेल्या एका पत्रामुळें झाला ! मनाची एक प्रकारची हुरहूर अगर जिज्ञासा नाहींशी होणें अगर तृप्त होणें यांतच आनंदाचा जन्म होत असतो. मला

त्या पत्राबद्दल सुमारें दोन महिन्यांपर्यंत वाट पाहावी लागली होती! दोन महिन्यांपर्यंत मी तसल्या मजकुराच्या पत्राची वाट पाहात होतों. तसलें पत्र मला दोन महिन्यांपूर्वीच यावयाला पाहिजे होतें. पण तें कां आलें नाहीं याबद्दल मला थोडा खेद देखील वाटूं लागला होता. असलें तें पत्र तरी कोणचें याबद्दल वाचक वर्गास जिज्ञासा वाटणारच, तेव्हां उगाच त्यांना फार वेळ खोळंबत ठेवून किंवा " पैठणी आग्रह " अगर " जांवई आग्रह " करून घेऊन नंतर तें दाखविण्याचा उपक्रम मी स्वीकारीत नाहीं. तें पत्र असें:—

भटवाडी, मुंबई

रा. × × × यांस

सा. न. वि. वि. आपण विमलच्या प्रकृतीसंबंधानें पाठविलेलें पत्र पोंचलें व तें वाचून आनंद झाला. बाबांच्या गैरहजेरींत तुम्हांला आमच्याकरितां बरेच त्रास पडत असतील. बाकी सध्यां तरी आपणाला उद्योग कोणचा आहे म्हणा ! अजून सनद देखील मिळाली नसेल........

खरेंच ! आपण पास झाल्याबद्दल Congratulations चें पत्र लिहिण्याचें मी आजपर्यंत कसें विसरल्यें होतें; कोण जाणे! वास्तविक गेल्या वर्षीप्रमाणें मीच तुम्हांला येथून पास झाल्याबद्दल बातमी तारेनें कळवावयाची, आणि तुम्हीं वाट सुद्धां पाहिली असेलच. पण त्या बाबतींत माझा पूर्ण नाइलाज होता. पण निकाल कळल्यानंतर मात्र मी आपणास पत्र लिहावयास पाहिजे होतें; पण तें विसरलें याबद्दल आतां अगदीं मनापासून माफी मागतें.

माझ्यावर आपला दुसराही एक राग होण्याचा संभव

आहे. वैशाखांत एकदां मी एका मैत्रिणीच्या लग्नाकरितां पुण्यास आले होते, पण मी त्या वेळीं दोनच दिवस राहिल्या-कारणानें मनांत भेटण्याची इच्छा असून देखील मला तुमची भेट घेतां आली नाहीं तेव्हां त्याबद्दल देखील तुम्ही राग धरूं नये.

या दोन्ही बाबतींत मी आपली क्षमा बरीच उशीरां मागत आहें. पण Better late than never.

आपण घेत असलेल्या तसदीबद्दल आई व बाबा आपले मनापासून आभार मानतीलच. पण असेच पुन्हां एकादे वेळीं बाबा बाहेरगांवीं गेल्यास आपण मला विमलच्या प्रकृतीबद्दल पत्र पाठवाल अशी आशा बाळगते. बिचारी विमल ! केव्हां एकदांचा तिचा भोग संपतोय्, ईश्वर जाणे.

कळावें. लो. अ. ही विनंति.

आपली

यमुना जोशी

* * * *

नाटका—कादंबऱ्यांतल्या तरुणांप्रमाणें जरी मी हें एका तरुण स्त्रीचें आलेलें पत्र अनेक वेळां वाचून तें मुखोद्गत केलें नाहीं तरी वरील पत्र मी दोन तीन वेळां वाचलें. त्यांत जो एक प्रकारचा सरळ व अगदीं मोकळा स्वभाव व्यक्त होत आहे त्याची मला बरीचशी आगाऊच कल्पना होती, पण ती पूर्णपणें पुनः एकदां निदर्शनास आल्यानें मनाला समाधान वाटलें.

यमुना व विमल या दोघी बहिणी बाबासाहेब कॉन्ट्रॅक्टर याच्या मुली. यांच्याशिवाय त्यांस आणखी तीन लहान (म्हणजे १० वर्षांच्या

आंतलीं) मुलें होतीं. मधलीं कांहीं दगावलीं असावीं. यमुना व विमल ह्या दोघींनाही कॉलेजपर्यंतचें शिक्षण मिळालेलें होतें. यमुना गेल्या वर्षी बी. ए. झाली होती, व परीक्षेचा निकाल लागण्यापूर्वींच तिचें बॅरिस्टर जोशी यांजशीं लग्न लागलें होतें. त्यांच्या आई सुगृहिणी असल्याकारणामुळें त्यांच्या घरांत खरें गृहसौख्य नांदत होतें.

बाबासाहेब व आमचें एकंदर कुटुंब यांची ओळख मागें एकदां कांहीं कारणानिमित्त ते जेव्हां उमरावतीस आले होते त्या वेळींच झाली होती. मी पुण्यास कॉलेजांत शिकण्याकरितां म्हणून जेव्हां डेक्कन कॉलेजांत गेलों त्या वेळेपासून बाबासाहेबांच्या मंडळींचा व माझा परिचय झाला. मी दोन वर्षे डेक्कनमध्यें व नंतर फर्ग्युसन-मध्यें रेसिडेन्सींतच होतों. लॉ कॉलेजांत आल्यावर मात्र मी रेसिडेन्सी सोडली व गांवांतच एक जागा घेऊन राहात असे. उन्हाळ्याच्या सुट्टींत यंदा आमची सर्वच मंडळी उन्हाळ्यानिमित्तानें पुण्यास येऊन राहिली होती म्हणून मी सर्व एप्रिल महिनाभर येथेंच होतों. परीक्षा २० तारखेच्या सुमारास झाल्यावर उरलेले दिवस जागा पाहणें वगैरेंत घालविले. ती मंडळी गेल्यावर नंतर मात्र मी येथेंच बिऱ्हाड थाटून वकिली सुरू करण्याचा इरादा केला होता.

माझ्या परीक्षेच्या निकालाच्या दिवशीं पत्रांत लिहिल्याप्रमाणें खरोखरीच मी तारेची वाट पाहात होतों, व जेव्हां ५–५॥ वाजे-पर्यंत तार आली नाहीं तेव्हां तर मी खास नापास झालों असेन असें मला वाटूं लागलें होतें. कारण यमूताई पुण्यास नव्हती तेव्हां ती मुंबईसच असावी; व तसें असल्यावर तिची तार तर येणारच अशी माझी खात्री होती.

बरं, तार नाहीं तर नाहीं; निदान Congratulations चें पत्र

तरी दुसऱ्या दिवशीं सकाळीं मिळावें, म्हणून मी अपेक्षा केली. सकाळची डाक येऊन गेली त्यांत तिचें पत्र नाहीं. तेव्हां दुपारच्या टपालांत तरी नक्की पत्र मिळणार म्हणून खात्री वाटूं लागली. पण खरोखर "भरंवशाच्या....." ही म्हण पक्की पटली! नंतर असाच कांहीं दिवस थांबून मी तो नाद सोडला.

१०।१२ दिवसांतच पुन्हां कळलें कीं, यमूताई पुण्यास येऊन दोन दिवस राहून परत मुंबईस गेली. या वेळेसच तिनें मला प्रथम भेटावयाचें मुद्दाम टाळलें अशी माझी समजूत होऊं लागली. काय कर्मधर्मसंयोग असेल तो असो, त्याच आठवड्यांत आमची मंडळी उमरावतीस परत गेल्याकारणानें मी बाबासाहेबांकडे गेलों नव्हतों; व ती पुण्याहून परत मुंबईस गेल्याच्या दुसऱ्याच दिवशीं मी त्यांज-कडे गेलों!

अशा प्रकारें तार नाहीं व पत्र देखील नाहीं. तसेंच पुण्यास आल्यावर भेट देखील नाहीं. तेव्हां मला जरा जास्त वाईट वाटूं लागलें. आपल्यावर प्रेम करणाऱ्या माणसानेंच एकाएकीं तें व्यक्त करणें बंद केलें तर आपणांस हुरहूर वाटणें अगदीं स्वाभाविक असतें. अशा समयीं मग आपण त्या माणसाचा जाणून बुजून अगर अजाणपणें कांहीं अपराध केला होता काय म्हणून स्मरणशक्तीस ताण देऊन कांहीं आठवण करण्याचा प्रयत्न करीत असतों. त्याच प्रमाणें मी स्वतः अशा प्रकारची कांहीं आठवण होते कीं काय म्हणून विचार करूं लागलों, व त्याचें फल म्हणून मला एक प्रसंग देखील आठवला. पण त्या प्रसंगाचा कांहीं एक परिणाम झालेला नव्हता हें मी समग्र दिलेल्या पत्रावरूनच सिद्ध होत आहे. तरी देखील तो प्रसंग मी वर्णन करून वाचकांची रजा घेतों.

एप्रिलमध्यें (माझी परीक्षा झाल्यावर व आमची मंडळी उमरावतीहून मेच्या सुरवातीस येण्यापूर्वी) यमूताई पुण्यास आली होती. एकदां सहज गप्पा मारतांना आमचा कांहीं ट्रिप्स (सफरी) करण्याचा विचार ठरला व त्याप्रमाणें आम्ही कार्ल्याच्या लेण्यांना व सिंहगडला जाऊन आलों देखील. ह्या सहलींच्या बाबतींत सर्वांत जास्त उचल यमूताईनें घेतली होती. तिचें म्हणणें असें कीं आतां या विवाहित स्थितीमुळें मोकळेपणानें भटकणें–फिरणें तिला दिवसेंदिवस अशक्य होत जाणार. तेव्हां आतां शक्य आहे तोंवर अशा पायीं भटकण्याच्या सफरी काढावयाच्या. आणि ही गोष्ट देखील खरीच कीं मातृपदावर आरूढ होण्याची इष्ट (?) आपत्ति आल्यावर बहुतेक स्त्रियांची स्वतंत्रता नष्ट होते. यमूताईच्या बाबतींत तसा प्रकार लवकरच येण्याचीं चिन्हें म्हणजे आपन्नसत्वत्वाचीं लक्षणें निदान मला तरी अजून दिसूं लागलीं नव्हतीं.

आमच्या सफरीचीं मनोरंजक व रसाळ वर्णनें देत नाहीं, कारण तीं सर्व अप्रस्तुत आहेत. ज्या प्रसंगाची हकीगत सांगावयाची तो प्रसंग दुपारच्या एक–दीड वाजण्याच्या सुमाराचा होता, व तें स्थळ म्हणजे कार्ल्याच्या लेण्यांतील तिसऱ्या नंबरचें लेणें–विहारलेणें–हाय. ह्या लेण्याचें वर्णन मी स्वत: आपल्या शब्दांत न देतां, प्रत्यक्ष त्या लेण्यांतच लिहून फरेम करून ठेविलेलें वर्णन देतों व तसेंच त्याचा मराठींत सारांश सांगतों.

This three storied cave was used as a refectory & dormitary by the monks living in this cave during the monsoon. The ground floor was used as a kitchen & the dining hall. The first and second floors were used as

dormitaries, each monk having a cell to himself, and in most cases a rough stone bench to lie on. The central halls in each cave were used as living rooms during the day time.

Poona
Dec. 1913

R. D. Banerji
Superintendent
Archaeological Survey, Western circle

[ ही तीन मजली गुहा जेवणखाण व निजणें-बसणें अशा प्रकारच्या राहण्यास उपयोगांत आणीत असत. ह्या गुहेंत महंत-मंडळी बहुधा पावसाळ्यांत राहत. तळमजल्यावर स्वयंपाक करण्याची व जेवण्याची जागा होती, आणि दुसऱ्या व तिसऱ्या मजल्यावर लहान लहान खोल्यांतून महंत राहात असत. प्रत्येक लहान खोलींत एक एक कोरलेला खडकाचाच बाक ( अगर पलंग म्हणा पाहिजे तर ) असे, व त्याचा उपयोग रात्रीचे वेळीं त्यावर निजण्यास होई. दरएक मजल्यावर मध्यभागीं एक एक मोठा दिवाणखाना आहे व त्यांत बहुधा दिवसाचा वेळ ते घालवीत असत. अशा पुष्कळच खोल्या आहेत व प्रत्येक खोलींत एका एका महंताची सोय आहे. ]

आम्ही या विहार लेण्यांत, सर्व लेणीं पाहिल्यावर व फराळ केल्यावर, विश्रांति घेण्यास्तव आलों. हें लेणेंच आम्हास इतर लेण्यांत पसंत पडलें होतें. अर्थात् मुख्य लेणें ( जो दिवाणखाना, बहुधा Convocation hall म्हणजे समारंभाकरितां वापरीत असत,) तें तर फारच प्रेक्षणीय आहे, पण तेथें स्वतंत्रपणें व निवांतपणें विश्रांति घेणें साधारणतः शक्य नसतें. ह्या लेण्यांतील रेसीडेन्सी सारखी व्यवस्था म्हणजे कॉलेजांच्या वसतिगृहांसारखी व्यवस्था आम्हांस

फारच पसंत पडली होती. आम्ही तेथें गेल्यावर विमल, यमू व आणखी त्यांच्या दोघी मैत्रिणी यांनीं एक एक खोली पसंत करून व त्यांतील बाकांवरील धूळ लुगड्यांच्या पदरांनीं झाडून त्या त्यांवर पहुडल्या. मला स्वतःला झोंप येत नव्हती अगर विश्रांतीची जरूरीही वाटत नव्हती. म्हणून मी आपला मधल्या दिवाणखान्यांत बसलों होतों. ह्या मुली जवळ जवळ दीड दोन तास तरी झोंप काढणार असा माझा अंदाज होता. म्हणून माझी कोटटोपी व इतर फराळाचें सामान-सुमान एका खोलींत विहारलेण्यांत तिसऱ्या मजल्यावर आल्या-बरोबरच मी ठेवून दिलें होतें. मध्यंतरीं कांहीं फलाहार ( म्हणजे केळीं, काकड्या, कैऱ्या इ. ) आम्ही केला, व नंतर मंडळी आप-आपल्या खोलींत गेली. मी एक पत्त्यांचा डाव घेऊन दिवाण-खान्यांत बसलों होतों.

कांहीं वेळ निसर्ग निरीक्षण, व नंतर पत्त्यांच्या 'पेशन्स' डावाच्या दोन तऱ्हा खेळून माझा स्वतःचा पेशन्स म्हणजे त्या प्रकारें वेळ घालविण्याची सहनशक्ति नाहींशी झाल्यावर, पुढें काय करावें म्हणून मला विचार पडला! तेव्हां युक्ति सुचली कीं कोटाच्या खिशांतून फाउंटनपेन व कागद आणावा आणि सफरीचा खर्च किंवा लेण्यासंबंधींची माहिती उतरून काढावी. म्हणून मी ते जिन्नस आणावयास गेलों. ज्या खोलींत माझा कोट व सामानाच्या पिशव्या ठेविल्या होत्या त्याच खोलींत कर्मधर्मसंयोगानें यमू निजली होती, किंवा तिनें झोंप घेत असल्याचा बाहाणा करून निदान स्वस्थ पडली होती. कारण मी त्या खोलींत गेल्या वेळेपासून परत येई-पर्यंत म्हणजे पत्ते ठेवणें व कोटाच्या खिशांतून कागद व फाउंटनपेन काढून पुन्हां जिन्नस व्यवस्थेशीर ठेवणें इत्यादि कामें करीपर्यंत, ती

थोडीफार चळवळ करीत होती. तें माझें सर्व सामान तिच्या उशागतींच होतें, म्हणून तिची चळवळ माझ्या स्पष्टपणें लक्षांत आली.

कागद व फाउंटनपेन मिळाल्यावर व मी ठरविलेला त्यांचा उपयोग केल्यावर घड्याळाकडे पाहिलें तों साऱ्या दहाच मिनिटांनीं कांटे पुढें सरकले होते ! नंतर मग मी दिवाणखान्यास असलेल्या मोठमोठ्या खिडक्यांतील एका खिडकींत बसून मला पसंत पडलेला एक देखावाच कागदावर काढण्याचा प्रयत्न करून पाहिला. अशा प्रकारें पुन्हां १५।२० मिनिटें घालविल्यावर मग कागद व फाउंटन-पेन यांचा कंटाळा येऊन पुन: पत्त्यांचाच आश्रय घ्यावा असें वाटूं लागल्यामुळें पुन: मी एकदां खोलींत गेलों व पत्ते आणले.

त्यानंतर सुमारें अर्ध्या तासांतच म्हणजे मला पुन: एकटें बसण्याचा कंटाळा येण्यापूर्वीच एक एक स्त्री विद्यार्थी रेसीडेन्सींतील खोल्यांतून दिवाणखान्यांत जमूं लागली.

पुढची हकीगत पुन: अप्रस्तुत असल्याकारणानें देण्याची जरूरी मला वाटत नाहीं. त्या निवांत वेळीं व अगदीं नि:स्तब्ध वातावरणांत यमूच्या खोलींत ती गैरसावधपणें निद्रिस्त असतां मी दोन वेळां प्रवेश केला. त्या वेळीं ती जागी असल्यास तिला अगदीं प्रथम-दर्शनी तरी माझा अत्यंत वाईट प्रकारचा संशय आला असावा. अशा प्रकारें कांहीं तरी निमित्त करून वारंवार त्या खोलींत जाऊन व ती बेसावध असतांना कांहींतरी चुंबनासारखा आचरट प्रकार करण्याचा माझा विचार असल्याबद्दल जरी तिला बळकट शंका आली असती तरी त्यांत तिचा दोष झाला असता अशांतला भाग नाहीं. कारण तरुण माणसें केव्हां मोहाला बळी पडतील व काय प्रकार करतील, त्याचा नेम नसतो. या कारणास्तव व " एकच

प्याल्यांतील " मास्तर कृष्णराव यांच्या प्रसिद्ध अशा " ललनामना नच अघलव शंका, अणुही सहते कदा.... "

या पदांत सांगितल्याप्रमाणें, जर यमूला माझ्याबद्दल वाईट संशय आला असला तर त्यांत युवती-मनाच्या विरुद्ध असें कांहींच नव्हतें. पण यमूच्या पत्रावरून सर्वच खुलासा पूर्ण झाला व तिचें माझ्यावर असलेलें मित्रत्वाचें प्रेम अखंडच होतें असा मला विश्वास वाटूं लागला. त्यानंतर मात्र मीही विहार लेण्यांतील प्रकारावर बसविलेली कल्पना विसरून जाण्याचा विचार केला; पण निदान कल्पनेनें तरी मी आपल्यास व्यभिचार करणारा कां ठरविलें याबद्दल मात्र, मला आश्चर्य वाटूं लागलें.

—रचनाकाळ, ऑक्टोबर १९२९.

## वधूपरीक्षा कीं वरपरीक्षाच ?

" मनोरमेनें माझा आज चांगलाच सूड उगवलान् म्हणावयाचा ! " मी आपल्याशींच म्हणालों !

तीन चार महिन्यांपूर्वींच माझ्या एका प्रेमी मित्राचें तिच्यावर प्रेम बसलें होतें, व तिचेंदेखील त्याजवर प्रेम आहे अशी त्याची बालंबाल खात्री पटली होती. म्हणून त्याच्यावर विश्वास ठेवून मी त्याच्या व तिच्यामधील पत्रव्यवहार पोंचविणारा पोस्टमन झालों होतों.

मला ही हलक्या दर्जाची ( पण एका दृष्टीनें फारच विलोभनीय अशी) कामगिरी फार वेळ करावी लागली नाहीं. दोन तीन पत्रेंच देणें—पोंचविणें संपल्यावर त्या दोन्ही मित्रांमधील संगम होण्याचा संभव नाहींसा झाला ! माझ्या मैत्रिणीचें म्हणणें पडलें कीं, तिचें त्याच्यावर कोणत्याही प्रकारचें विशेष लक्ष नव्हतें—फक्त वर्गातील एक हुशार विद्यार्थी म्हणून तो नांवानें व चेहरेपट्टीनें तिला ठाऊक होता इतकेंच. माझ्या मित्रानें मला त्याच्या प्रेमसंबंधाचे उगम, वर्धन, व परिसीमा कसकशी व कोणकोणच्या

कारणांस्तव होत गेली ती सर्व हकीगत इत्थंभूतपणें निवेदन केल्यावर माझा देखील त्याच्या हकीगतीवर फारसा विश्वास न बसून तो दुष्यन्त राजानें वर्णन केल्याप्रमाणें,

सर्वं तत्किल मत्परायणमहो कामी स्वतां पश्यति ।

अशा वर्णनाचा एक प्रेमी जीव होता. अतएव तो कींव करण्याच्या लायकीचा होय अशी माझीही ठाम समजूत झाली होती. पण हा पत्रव्यवहार नेत–आणीत असतांना एकदां मनोरमेनें मीं ह्या बाबतींत मध्यस्थी केल्याबद्दल मजजवळ थोडीशी नाखुषी व्यक्त केलेली होती त्याची आठवण मला आज झाली व माझ्या तोंडून वर लिहिलेलें वाक्य बाहेर पडलें.

मनोरमेच्या घरून मी नुकताच परत आलों होतों व आपल्या खोलींत कपडे काढीत असतांना मी वरील उद्गार काढले होते. मनोरमेच्या घरच्या सर्व मंडळींची व माझी दाट ओळख होती. फार कशास पाहिजे तिच्या वडिलांस तिच्याचप्रमाणें मी व माझीं भावंडें देखील बाबाच म्हणत होतों. बाबासाहेबांचें घराणें व आमचें घराणें यांमध्यें पूर्वींचीच थोडीशी ओळख एका आळींत राहात असल्याकारणानें झाली होती. पण पुढें आमचीं दोघांचींही स्वतंत्र मालकीचीं घरें निरनिराळया पेठांत झाल्याकारणानें आम्ही दूरदूर झालों होतों. तरी देखील आमच्या मंडळींत बहुधा रोज जाणें येणें असे.

मी अलीकडे एक दोन वर्षें 'उप-वधू' होतों असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं; पण माझ्याच हट्टामुळें माझें लग्न लांबणीवर पडलें होतें. आतां शिक्षण वगैरे संपलेलें असल्याकारणानें लग्न न करण्यास मला दुसरी सबबच शिल्लक राहिलेली नव्हती. माझे वडील तीन वर्षांपूर्वीं वारल्यापासून व इतर मोठी मंडळी घरांत नसल्या-

कारणानें इष्ट–मित्रांवर व लांबच्या पण वयस्क अशा नातेवाईक मंडळीवर मी थोडाफार विसंबून असें. बाबासाहेब हे अशाच मंडळी-पैकीं प्रमुख होते; म्हणूनच त्यांना माझ्या लग्नासंबंधीं थोडी काळजी वाटत होती.

काल सकाळीं सहजच मी बाबासाहेबांकडे गेलों होतों. त्या वेळीं त्यांच्या दिवाणखान्यांत आणखी दुसरे एक गृहस्थ आले होते म्हणून 'गाडयाबरोबर नळयाला यात्रा' या म्हणीप्रमाणें त्यांच्या बरोबर मला देखील चहा मिळून माझी त्या दिवशीं जरा जास्त 'चहा' झाली होती. थोडया वेळानें ते बडे गृहस्थ गेले व दुसरीच तीनचार मंडळी आली. अशी कोणी मंडळी बाबासाहेबांकडे एक मुलगी पाहा-वयास येणार अशी कुणकुण माझ्या देखील कानांवर आली होती. त्यांच्या घरच्या इतर मंडळीकडून माझ्या कानांवर अशी वार्ता आली होती कीं कोणी एक परगांवचे बाबासाहेबांचे मित्र आपल्या घरची उपवर अशी मुलगी पुण्याच्या मार्केटांत(लग्नबाजारांत) खपविण्याच्या इराद्यानें आले आहेत. ते गृहस्थ देखील मी सहज येतांजातांना ओझरते असे पाहिले होते, पण ती मुलगी मात्र मी पाहिली नव्हती. मी हॉलमध्यें बसलों असतांच अर्धवट असा तर्क केला होता कीं, कोणी तरी मंडळी 'वधूपरीक्षा' करण्याकरतां येणार आहेत. तेव्हां ती तीनचार मंडळी ( बहुतेक सर्व समवयस्क असे विद्यार्थीच होते ) व विशेषत: त्यांतील एकजण (जो माझ्या तोंडओळखीचा होता व ज्याच्या नांवाचा उच्चार पूर्वी एकदा वधूपरीक्षा संबंधांत माझ्या कानांवर पडला होता ) पाहून तर माझी खात्री झाली कीं आतां त्या हॉलमध्यें 'वधूपरीक्षा' होणार ! मी स्वत: वधूपरीक्षा कधीं केली नव्हती अगर 'वधूपरीक्षा' होतांना प्रत्यक्षपणें आणि अथपासून

इतिपर्यंत पाहिली नव्हती. फक्त रा. रा. वरेरकरकृत 'हाच मुलाचा बाप' हें नाटक पूर्वीं दोन वेळां पाहिलें होतें. त्यांतील वधूपरीक्षेचे देखावे पाहून मात्र माझी अतिशय करमणूक झाली होती. त्याच-प्रमाणें माझ्या दोन बहिणींचीं लग्नें होण्यापूर्वीं त्यांची वधूपरीक्षा होत असतांना आम्ही कधीं मागच्या माडीमधून अगर जिन्यांत आड उभें राहून काय मौज उडते ती कल्पनेने जाणली होती ! बाबासाहेबांच्या येथील पाहुण्या मुलीला पाहावयास आलेली मंडळी बघून मला मी नुकत्याच वाचलेल्या 'यशवंत' मासिकाच्या ताज्याच अंकांतील रा. रा. बोकील यांच्या ' जमीन व अस्मान ' या लेखां-तील वधूपरीक्षा करण्यास गेलेल्या चार मित्रांची आठवण झाली. तत्पूर्वीं आणखी एकदां असेंच कोठें तरी कोठल्या तरी गोष्टींत वधूपरीक्षा करण्याकरितां गेलेल्या मित्रांच्या टोळीबद्दल वाचल्याचें आठवलें. पैकीं बोकील यांच्या गोष्टीमधील टोळीला ' वहिनींच्या ' करामतीमुळें अखेर वधूपरीक्षा करावयासच लाभली नाहीं; आणि त्या दुसऱ्या गोष्टींतील वधूपरीक्षा करावयास गेलेल्या मुलाच्या पदरांत ती मुलगी न पडतां, त्याच्या पुढें पुढें करणाऱ्या एका मित्राच्या गळयांतच खरा नवरदेव तो तोच अशी त्या मुलीची चुकीची समजूत झाल्यामुळें पडली होती. असो. आपणास जुन्या–नव्या वाङ्मयांतील आठवणींबद्दल काय करायचें आहे ? प्रस्तुत म्हणजे ती वर–मंडळी आल्याबरोबर मी आपला बाबासाहेबांचा निरोप घेऊन निघून गेलों.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं–चार–साडेचार वाजतां मला बाबा-साहेबांच्याकडचें बोलावणें आलें. "कशाबद्दल, काय म्हणून" वगैरे मी चौकशी केली पण कळलें कीं सहजच. तेव्हां मी आपला नेहमीप्रमाणें

त्यांच्या घरीं गेलों व गप्पा मारीत बसलों. तेव्हांपासून तों मी परत येईपर्यंत मला बाबासाहेबांनीं एवढें मुद्दाम होऊन कां बोलाविलें होतें त्याचा पत्ताच लागला नाहीं. पण घरीं येऊन स्वस्थ बसून त्या दिवशीं संध्याकाळीं एकंदर हकीगती कसकशा घडत गेल्या याची आठवण व थोडेंसें मनन केल्यावर मग मला एकंदर हकीगतींचा उलगडा पडूं लागला. लहानपणीं 'क्रमिक' पुस्तकांत वाचलेली "सौदागर व हरवलेला उंट" ही कथा आठवून त्यांत सौदागर जसे 'फक्त एकाच बाजूच्या झाडांच्या फांद्या खाल्लेल्या दिसतात. म्हणून तो उंट दुसऱ्या बाजूच्या डोळयानें आंधळा असलाच पाहिजे' वगैरे अंदाजधपक्यानें तर्क बांधतो त्याप्रमाणें मी देखील त्या संध्याकाळच्या हकीगतींसंबंधीं आपले तर्क बसवूं लागलों. ते तर्क म्हणजेच माझी पुढची हकीगत होय.

प्रथम मी बाबासाहेबांच्या खोलींतच गप्पा सांगत बसलों होतों. पण सुमारें पांच दहा मिनिटें झाल्यावर मनोरमेनें मला मुद्दाम होऊन तिच्या अभ्यासाच्या माडींत निव्वळ गप्पा मारण्याकरितां म्हणून बोलावून नेलें. मी ज्या वेळीं तिच्या माडींत गेलों त्या वेळीं तेथें तीन खुर्च्या असून एकावर स्वतः मनोरमा बसली, एकावर त्यांच्याकडचे पाहुणे अगोदरपासूनच बसलेले होते व रिकामी खुर्ची मला देण्यांत आली. मनोरमा ज्या खुर्चीवर बसली होती ती खुर्ची एका टेबलासमोर ठेविलेली होती व त्या टेबलावर तिचीं पुस्तकें व वह्या अस्ताव्यस्तशा पसरल्या होत्या. त्या टेबलाशेजारींच पण एका लांकडाच्या मजबूतशा पेटीवर एक प्रौढशी मुलगी, अगर बाई म्हटली तरी चालेल, (कारण ती तिच्या चेहऱ्यावरून मनोरमेची थोरली बहीण तरी नक्की शोभली असती.) एक कसला तरी

मासिकाचा अंक घेऊन बसली होती. तें मासिक बहुधा सचित्र असलें पाहिजे कारण ती स्त्री जितका वेळपर्यंत तेथें बसली होती तितका वेळपर्यंत तें अर्धवट चाळीत असतां त्यांतील चित्रेंही मला ओझरतीं दिसत होतीं. ती मधून मधून आमच्या संभाषणा-कडे लक्ष देऊन एकंदर मंडळीकडे व विशेषतः माझ्याकडे पाहात असे. पण त्या तिच्या माझ्याकडे वरचेवर पाहण्याचा अर्थ मी असा घेतला कीं, मी तिच्या दृष्टीच्या टप्प्यांत सहजपणें असा पडणारा असल्याकारणानें आणि शिवाय इतर मंडळी नेहमींच्याच परिचयाची, म्हणून ती माझ्याकडे स्वाभाविकच बघत असेल.

मनोरमेच्या माडींत तिच्या पाठोपाठ मी आल्याबरोबर बाबा-साहेब देखील आलेच व सुचविण्याकरितां म्हणूनच कीं काय पण चेष्टेंतच अलीकडे ते वरचेवर करीत असलेला प्रश्न पुन्हा एकदां बोलले. तो म्हणजे—“ काय मार्तंडराव यंदा लाडू घालणार कीं नाहीं आम्हांला ? ” हा होय; व त्यावर माझें ठराविक उत्तर देखील मी आपल्या नेहमींच्या पद्धतीवर दिलें कीं “ जमल्यास घालूं यंदा, नाहीं तर पुढें केव्हां तरी ! ” असलेच एकदोन किरकोळ प्रश्न झाल्यावर बाबासाहेब निघून गेले.

बाबा निघून गेल्यावर मनोरमा म्हणते—“ शांती गेली ना काल ? ख्रिसमसची गर्दी कितपत होती गाडीला ? ”

“ भयंकर गर्दी होती काल दुपारच्या एक्सप्रेसला. आमचा हमाल तर, पैसे घेतांना म्हणाला कीं ‘ रावसाहेब असें कां ? आजच्या सारखी गर्दी आमच्या आठवणींत बी कंदी झाली नव्हती. दोन आणे जास्त द्या साहेब चहापाण्याला.’ मोठ्या माराकुटीनेंच आम्ही जागा मिळविली ! ”

" दुपारच्या गाडीला, नाहीं तरी, गर्दी नसते केव्हां ? मी जेव्हां जेव्हां त्या गाडीनें गेलें आहे तेव्हां माणसें अगदीं चिक्कार भरलेलीं असत."

" तरी कालची गर्दी खरोखरच फार प्रेक्षणीय होती. एक्सप्रेसची सुटावयाची वेळ साडेतीनची, तर थर्डक्लासची तिकीट विक्री म्हणे दोनलाच बंद करण्यांत आली ! आम्ही जागा धरून ठेवितां यावी म्हणून, लवकरच म्हणजे दोनला पांच मिनिटें कमी असतांना स्टेशनावर गेलों; आणि पाहतों तों काय ? ४०।५० माणसें आमच्या आधींच प्लॅटफॉर्मवर उभीं ! नेहमींच्या पद्धतीप्रमाणें म्हणजे पावणेतीनला गाडी प्लॅटफॉर्मला लागावयाची, पण काल तीन नंतर लागली. आणि गाडी येण्यापूर्वीं प्लॅटफॉर्मची शोभा मात्र पाहण्यासारखी होती. आपल्या पुण्याच्या स्टेशनचा प्लॅटफॉर्म एवढा भव्य, पण माणसांनीं नुसता गजबजून गेला होता. अगदीं थोडक्यांत सांगावयाचें तर बॅकबेवरच्या गर्दीप्रमाणें अफाट गर्दी दिसत होती!"

" मग शांतीला जागा कशी काय मिळाली अखेरीस ? "

" तिला आपली मिळाली जागा कशीतरी बसायला, म्हणा.पण आम्हाला कोण युक्त्या आणि गनिमी कावे लढवावे लागले. ती व तिचे यजमान यांना पोंचवावयास मी आणखी त्यांचेच दोन मित्र गेलों होतों म्हणून बरें झालें. शांतीला, विन्याला घेऊन, प्लॅटफॉर्मवर हिंडत ठेविली, वसंतरावांचा एक मित्र सामान संभाळीत राहिला आणि बाकीचे आम्ही घुसलों झालें गाडींत आणि एक बांक अडवून टाकला. एकदोन मिनिटांत बहुतेक थर्ड क्लासचे डबे 'ब्लॅक होल ऑफ कलकत्ता' ( कलकत्याच्या अंधार कोठडी ) प्रमाणें गजबजून गेले. म्हणून ऑर्डर ( शांतता व सुव्यवस्था ) राखण्याकरतां एक गोरा

सार्जंट व पोलिस डब्यांतून घुसले. त्यांस प्रवेश मिळण्याकरतां देखील दंडुक्याचा उपयोग अत्यंत अल्पस्वल्प प्रमाणांत करावा लागला.... ...."

"आम्ही एक अद्भुत् कथाच ऐकत आहों असें वाटतंय्."

"पण सार्जंटनें खरोखरच लवकर, म्हणजे दहा मिनिटांच्या आंत व्यवस्था लावून दिली. गाडीच्या दारांना कुलुपें लागलीं व बरीचशी मंडळी प्लॅटफॉर्मवर राहून गेली. इंटर, सेकंडमध्यें देखील हीच तऱ्हा."

"रेल्वे कंपनीनें खरें म्हटलें तर अशा वेळीं एखादी स्पेशल गाडी सोडावयास हवी."

"सोडावयाला हवी पुष्कळ. पण कंपनी पाहणार सेकंडक्लास फर्स्ट क्लासवाल्यांची सोय. थर्ड क्लासचे लोक मरत ना ?"

"पण आतां तर तुम्हीच सांगितलंत् कीं सेकंड क्लासमध्यें देखील मारामाऱ्या झाल्या जागेबद्दल?"

"तें सगळें खरें. मांजराच्या गळयांत घंटा बांधण्याचे ठराव पुष्कळांस आणतां येतात व त्यावर कॉंग्रेसमधल्या मोठमोठया वक्त्यांप्रमाणें चांगलीं तासतास भाषणें करतां येतात. पण प्रत्यक्ष ती घंटा बांधण्याचें काम कोण करणार ?"

"ह्या रेल्वे पुराणाबरोबर बिचाऱ्या कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांवर कां संताप? आतां तर त्यांनीं स्वातंत्र्य पुकारिलें आहे म्हणे! आणखी प्रत्यक्ष कार्य कोणतें करावयाचें शिल्लक राहिलें ?"

"मला तर कॉंग्रेस व पॉलिटिक्स (राजकारण) या विषयाचा अतिशय तिटकारा आला आहे, म्हणून मी अलीकडे वर्तमानपत्रें वाचीत देखील नाहीं."

"बरं बुवा. तो विषय जाऊं द्या. मी तरी म्हणा कोठें वाचतें वर्तमानपत्रें." थोडा वेळ थांबून "तुमचा अभ्यास काय म्हणतो?"

"हें पहा, दोन विद्यार्थ्यांनीं एकमेकांना अभ्यासाविपयीं प्रश्न न विचारणेंच बरें. नाहीं तर 'याचको याचकं दृष्ट्वा श्वानवत् गुर्गुरायते' असा प्रकार व्हावयाचा!"

ह्या वाक्यानें सर्वच मंडळींत किंचित् हंशा पिकला. ती हास्याची लहर अगर लाट मावळत आहे तोंच मी पुढें म्हणालों—"पण मी कांहीं आतां खराखुरा विद्यार्थी राहिलों नाहीं. एम्. ए. चा विद्यार्थी मी. तेव्हां मी काय श्वान होणार आहे थोडाच!"

"मग काय मी श्वान होणार होय? या जन्मांत कांहीं श्वान अगर शुनि होण्याचा योग दिसत नाहीं, पुढील जन्माचें कोणीं सांगावें!" यावर हंशाच हंशा पिकला.

हा इतका वेळपर्यंत पाहुणे गृहस्थ व ती प्रौढ वधू, एक अक्षर देखील कोणी बोललें नव्हतें. त्यांना भाग घेतां येईल असा विषयच नव्हता मुळीं निघाला. त्या ठिकाणीं साधारणत: विषय उकरून काढण्याचें काम मनोरमेचें. पण तिनें मुळींच एवढा वेळपर्यंत असेच विषय काढले कीं त्या बाबतींत फक्त मीच मुख्यत: व तिनें पूरणात्मक असें बोलावें. संभाषणासंबंधीं म्हणजे Lively conversation संबंधीं काउपर कवीनें असें म्हटलें आहे कीं,

('We should try to keep up conversation like a ball bandied to and fro from one another, ratner than seize it all to ourselves, and drive it before us like a foot-ball.')

संभाषण हें फुटबॉलच्या खेळांतील चेंडूप्रमाणें असावें. फुटबॉल जसा

ह्या गडयाकडून त्या गडयाकडे, त्याच्याकडून दुसऱ्या एखाद्याकडे.... थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे तो चेंडू जसा सर्वांना खेळावयास मिळतो, तद्वतच संभाषण असें असावें कीं, ज्यांत वाक्पटूला तसेंच मुखस्तंभाला, परिचित इसमाला तसेंच अपरिचिताला देखील भाग घेता यावा.

पण हा साधा नियम मनोरमा सर्वसाधारण लोकांप्रमाणें विसरली असल्यास तिला फारसा दोष देतां येत नाहीं. मी जो एवढा खोलींत बसून विचार करीत आहें व दुसऱ्यास नांवें ठेवीत आहें त्या माझ्या हातून देखील हीच चूक समाजांत वावरतांना होत असेल पुष्कळदां!

काय योगायोग पहा. 'श्वान' व 'शुनि' यांचा संबंध मात्र आला आमच्या संभाषणांत, तोंच मनोरमेचा आवडता कुत्रा टॉम धाड्धाड् उडया टाकीत खोलींत आला, व त्यानें दंगामस्ती करावयास सुरवात केली. खालच्या मजल्यावर त्याला बांधलेला होता. कोणी तरी सोडला असेल त्याला व त्याबरोबर त्यानें उसळी मारून सांखळीसकट माडीची वाट धरली होती. अर्थात् त्याची दंगामस्ती कमी झाल्यावर त्याच्या पायांत अडखळणारी सांखळी सोडून मी त्यास पुरती मोकळीक करून दिली. पण मोकळीक मिळाल्यावर मात्र तो बराच शांत झाला. काय मजा आहे पहा, कीं जोंपर्यंत सांखळीनें बांधलेला असा कुत्रा असतो तोंपर्यंतच सुटण्याची त्यास मळमळ असते, पण मोकळा झाल्यावर स्वातंत्र्याची त्यास गोडीच राहात नाहीं!

टॉम दिसल्यावरच बहुधा मनोरमेला आमच्या कैलासवासी 'मोत्याची आठवण झाली असावी. कारण तिनें त्याची आठवण काढून आम्ही त्याच्यानंतर दुसरा कुत्रा कां ठेविला नाहीं अशी पृच्छा केली. पण त्या प्रश्नास योग्यसें उत्तर न देतां आल्याकारणानें

मी मोत्याची थोडी स्तुति करून तो मेलेल्या दिवसाची स्मृति सांगितली. आमच्या मोत्याची इतर जगाला सांगण्यासारखी एक तरी हकीगत होती आणि ती म्हणजे त्याच्या मृत्यूचीच. इंग्लंडचे प्रसिद्ध मुख्य प्रधान लॉर्ड ॲस्क्विथ यांच्या मृत्यूची बातमी ज्या दिवशीं वर्तमानपत्रांत मी वाचली होती त्याच दिवशीं संध्याकाळीं आमचा मोत्या बिचारा इहलोक सोडून गेला. त्या दिवशींच्या माझ्या डायरीत लॉर्ड ॲस्क्विथच्या बरोबरीचा मान आमच्या मोत्यानें मजकडून मिळविला !

ही कुत्र्यांची हीकगत अगर विषय, खरोखरच असा होता कीं, त्यामध्यें त्या पाहुण्यास अगर प्रौढ वधूस त्यांत खात्रीनें थोडा तरी भाग घेतां आला असता. अगदीं 'हवापाण्यासारखा, रुक्ष व थोडक्यांत संपुष्टांत येणारा हा शिळा विषय नसून पुष्कळदां बऱ्याच माणसांस अगदीं जिव्हाळ्याचा वाटणारा असा हा विषय होता. पण काय असेल तें असो, कॉन्ग्रेसमधील ठरावांचा त्यांच्या मनावर परिणाम झालेला असावा; म्हणून त्यांनीं पुढेंमागें ब्रिटिश सरकारशीं करावयाच्या असहकारितेची पूर्व तयारी म्हणून आमच्याशीं अबोला धरण्यांत तरी त्यांनीं सहकारिता केली.

पण असहकारिता हें एक अत्यंत अवघड व पाळण्यास अत्यंत बिकट असें अस्त्र होय अशी त्यांची खात्री पटली असावी. कारण पाहुण्यांना इतका वेळ बसून कंटाळाच आला होता म्हणून कीं काय त्यांनीं मनोरमेजवळ त्यांच्या घरच्या फोनोग्राफची चौकशी केली. तेव्हां तिनें माहिती सांगितली कीं त्यांच्या घरांत सध्यां तरी संगीताची आवड असणारें एक देखील चिटपाखरूं नव्हतें. फक्त कधीं कधीं मीच (मार्तंडराव) त्यांचे घरीं गेल्यास कांहीं वेळ तो लावीत असें, आणि याचें कारण म्हणजे पेटी वाजविण्यास मदत म्हणूनच.

इतका वेळपर्यंत बराच उशीर झाला होता; व नंतर मग कदाचित् माझ्या टेनीसची एक टर्न मिळाली असती तीहि बुडण्याचा संभव, म्हणून मी घरीं यावयास उठलों. त्यावर मनोरमेनें पुन: कांहीं विषय काढण्याचा प्रयत्न केला. पण त्या वेळेस मी टेनिसची सबब काढून जाऊं लागलों. तेव्हां तिनें मुद्दाम होऊन (कारण तिला ती हकीगत पूर्वीं एकदां मी स्वतःच सांगितली होती.) माझ्याकडून नुकत्याच टेनीसच्या ओपन टूर्नामेंट्समधील माझ्या मॅचची हकीगत वदविली. पण मला वेळ थोडा असल्याकारणानें मी ती फार थोडक्यांत सांगून तेथून निघालों. अर्थात् जातांना पुन: एकदां बाबासाहेबांची गांठ घेऊन निघालों. कारण न जाणो,जर कोणत्या कारणाकरितां त्यांनीं मला मुद्दाम बोलावलें असेल व हें म्हातारपणाच्या विस्मृतिदोषानें ते विसरले असल्यास पुन: एकदां मला प्रत्यक्षपणें पाहिल्यास त्यांची स्मृति जागी व्हावी व त्यांचें तें काम निकालांत निघावें ही देखील इच्छा होती. पण तसें कांहीं न होतां मला निरोप मिळाला.

लग्नें जुळविण्याचा घाई अगदीं म्हातारी स्त्री-पुरुष मंडळी यांना व तरुण पण नुकत्याच लग्न झालेल्या जोडप्यांस फार असते, असें म्हणतात. पण माझ्या पाहण्यांत अशीं कांहीं अविवाहित तरुण मुलें मुली आहेत कीं ज्यांस, सुप्रसिद्ध कादंबरीकार जेन ऑस्टिनच्या 'एमा' प्रमाणें स्वतःचें तर लग्न होण्याबद्दल बेफिकिरी दाखवून लोकांचीं लग्नें जमविण्याची तीव्र इच्छा असते. अशांपैकीं जरी मनोरमा एक नसली तरी एकादें लग्न जमण्यास आपल्या मध्यस्थीचा थोडासा उपयोग होईल कदाचित्, असें वाटल्यास तशी मध्यस्थी करण्याचा धीटपणा तिजमध्यें होता. तिला विशेषत: माझ्या मतांची व विचारांची बरीचशी ओळख झाली होती. कारण आम्ही

दोघेंही कॉलेजांतीलच पडल्याकारणानें, आणि सुमारें वर्षापूर्वी गणित विषयाबाबत कांहीं वेळां तिला अभ्यासांत माझी मदत देखील लागली असल्याकारणानें तिची माझी खूपच दाट मैत्री झालेली होती. त्याच ओळखीच्या जोरावर मी माझ्या मित्राचीं प्रेमपत्रें पोंचविण्याची जबाबदारी स्वीकारली होती. आणि ह्याच कारणांस्तव असेल बहुतकरून, कीं मनोरमेनें वधूपरीक्षेची ही नवी व मला पसंत पडेल अशी रीत उपयोजिली होती. नाहीं तर एवढा अभ्यासाचा जवळजवळ एक तास तिनें माझ्याशीं व्यर्थ गप्पा करण्यांत खास घालवला नसता. कारण अभ्यासाची खरोखरच तिला मनापासून आवड होती आणि तशी ती बुद्धिवान् देखील होती. फर्स्ट इयरच्या परीक्षेंत ती पहिल्या वर्गांत आली होती व आतां इंटरमध्यें देखील ती स्वतःकरतां व कॉलेजकरतां नांवलौकिक कमावील अशी तिजबद्दल सर्वांची अपेक्षा होती. या कारणांमुळें माझी पक्की खात्री झाली कीं मला वधूपरीक्षेनिमित्तच मनोरमेनें इतका वेळ डांबून ठेविलें होतें.

वरील वधूपरीक्षेचा प्रकार होऊन गेल्याला एकदोन दिवस होऊन गेले. त्या बाबतींत आतां माझे विचार परिपक्व झाले. खरें म्हटलें तर ती 'वधूपरीक्षा' न होऊन 'वरपरीक्षा'च झाली असें माझें मत निश्चितपणें बनलें. कारण माझ्याबद्दलची पुष्कळच माहिती त्या पाहुण्या मंडळींस त्या वेळांत मिळाली. माझें शिक्षण, देहयष्टी खेळांतील प्रावीण्य, संगीतविषयक आवड, भाषणपद्धति, स्वभाव वगैरे किती तरी गोष्टी त्यांच्या नजरेस पडल्या असतील ! उलट माझ्या तर्फेनें विचार केला तर काय ठरतें? मला ती मुलगी शरीरानें व रूपानें कशी काय आहे तें व तिला मराठी लिहितां

वाचतां येत असलें पाहिजे हें ज्ञान मिळालें. पहिलें अर्थात् तिच्या त्या खोलींत हजर राहण्यामुळें, तर दुसरें ज्ञान तिच्या हातांतील सचित्र मासिकामुळें झालें!

ही सर्व हकीगत वाचून सर्वसाधारण वाचकवर्ग 'हाच मुलाचा बाप' या नाटकांतील डॉ. पशूची ज्याप्रमाणें थोडीशी कींव करतात व 'बरी खोड माडली मेल्याची' असें म्हणतात.त्याप्रमाणें माझ्या-संबंधीं देखील म्हणतील, अशी मला साधार भीति वाटते. कारण या नव्या प्रकारच्या वधूपरीक्षेमध्यें उपयोजकाच्या अगर मध्यस्थांच्या अहेतुपुरस्सर घडलेल्या चुकीमुळें फक्त वरपरीक्षाच होऊन 'वधू-परीक्षा' अचानकपणें विसरली गेली.पण माझ्या हकीगतींतील मध्यस्थ मंडळी 'हाच मुलाचा बाप'मधील, डॉ. गुलाब-मंजिरी प्रमाणें माझी थट्टा व उपमर्द करण्याच्या हेतूनें प्रेरित झालेली नव्हती.उलट त्यांचा हेतु सात्त्विक स्वरूपाचाच असला पाहिजे ही गोष्ट देखील सुज्ञ वाचकांच्या लक्षांत येईल. डॉ. पशूची फजिती मंजिरीकडून कर-विण्यांत त्या 'सोनेरी टोळी'चा हेतु यमुनेच्या अपमानाचा सव्याज सूड उगवण्याचा होता! येथें तर लग्न जमविण्याचा शुद्ध हेतु. तेव्हां माझी कोणी कींव करावयास नको हेंच स्पष्टपणें सांग-ण्याचा उद्देश.

वरील हकीगतीचें पुराण संपवितां संपवितांच श्रीयुत श्री. कृ. कोल्हटकर यांच्या 'वधूपरीक्षा'नाटकाची मला आठवण झाली.त्यांतील नायक धुरंधर राजपुत्र हा खरोखर वधूपरीक्षा करावयास म्हणून पण ज्योतिषाचे वेषानें हस्तसामुद्रिक अगर पत्रिका-पाहण्याचें मिषानें जाऊन तीनचार मुलींमधून एक मुलगी पसंत करतो. त्याच्या पहिल्याच प्रयत्नांत त्यास यश येऊन दरिद्री त्रिवे-

णीला तो आपली पट्टराणी करण्याचें मनांतल्या मनांत ठरवितो. तिनें स्वत:चा हात ज्योतिषीबुवांच्या हातांत, तो पाहून भविष्य सांगण्याकरितां, दिला असतांना धुरंधर आपल्याशींच एकदम उद्गारतो--' किती हा स्निग्ध हात.... ' वगैरे; व त्रिवेणी देखील त्या प्रवेशांत म्हणते कीं हयांच्याच हातांत जन्मभर हात देऊन राहावेंसें वाटतें !

प्रतिभावान् नाटककाराच्या 'वधूपरीक्षे'विषयींच्या कल्पना व माझ्यासारख्या सामान्य मनुष्याच्या कल्पना तसेंच अनुभव यांचा मेळ कसा बसावा ? पण माझ्या विचारसरणीचा परिणाम मनोरमेवर खास झालेला होता म्हणूनच तिनें स्वत:ची कल्पनाशक्ति आणखी थोडी खर्ची घालून वधूपरीक्षेची ही नवी रीत शोधून काढली होती. पण मोठमोठया शोधकांच्या शोधांचा पहिला प्रयोग जसा अयशस्वी होण्याचा बराच संभव असतो, तद्वतच मनोरमेचा प्रयोग उलटला असला, तरी प्रौढ वधूवरांच्या परीक्षा करण्याची ती एक पद्धति खास वधूवरांस तर आवडणारी ठरेलच पण त्यांच्या पोक्त नातेवाइकांस देखील पसंत पडेल असा माझा विश्वास आहे.

--रचनाकाळ, ता. ४ व ५ जानेवारी, १९३०.

# अजाण कावेरीचा प्रश्न

डाउन नागपूर मेल (नागपूरकडे जाणारी) बडनेरा स्टेशनांत शिरत होती. पहांटेच्या चारच्या सुमाराची वेळ असल्याकारणानें स्टेशनवर अर्थात् कांहीं गडबड दिसत नव्हती. स्टेशनवरील गॅसच्या दिव्यांचा देखील उजेड जरासा मंदावूं लागला होता. थोडा गारवा अगर थंडी वाटत होती, म्हणून मी किंचित् कुडकुडत आणि जांभया देत व गरम कोटाच्या दोन्ही बाजूंच्या खिशांत हात कोंबून असा, तयारीनें व हुशारीनें उभा होतों. धाड् धाड्,धाड् धाड् करीत गाडीचें इंजिन दुसऱ्या टोंकाला जाऊन पोंचलें देखील. इतर पॅसेंजरांची (उतारूंची) फारशी चढउतार नव्हती म्हणून मी घाई करीत नव्हतों किंवा उगीच लटपट किंवा धांदल करीत नव्हतों. बहुतेक फर्स्ट क्लास व सेकंड क्लासच्या डब्यांतून काळोखच होता. क्वचित् एकाद्या डब्यांतून विजेच्या दिव्याचा उजेड डोकावत होता. मी इंजिनाकडे चालत गेलों. त्या टोंकापासून दुसरा तिसराच डबा बायकांचा होता. व त्याच डब्यांतून थर्डक्लासच्या

डब्यांपेक्षां देखील जास्त गडबड ऐकूं येऊं लागली. माझ्या बरो-बरच्या हमालानें सामान बाहेर काढलें व इंदू व डायना मैत्रिणींचा निरोप घेत घेत–गुडबाय करीत–डब्यांतून उतरल्या. सर्व सामान आलें कीं नाहीं हें पाहण्याकरितां मी डब्याच्या दारांतून डोकावूं लागलों. तेव्हां सातआठ मुलींची गडबड चाललेली दिसली. तीन-चार आठदहा वर्षांच्या आंतील मुली मात्र खुशाल स्वस्थपणें घोरत पडल्या होत्या. एक दोघी जणी डोळे चोळीत चोळीतच म्हणाल्या: ‘ आम्हाला लवकर कां ग उठवलें नाहींत गाढवींनो ? ’

तिसरीच एक पाठीवरच्या वेणीचे विसकटलेले पेड वळतवळत म्हणाली–“ बडनेरा इतका लवकर कसा येईल ? अग आधींच्याच कुठल्या तरी स्टेशनावर उतरत असशील डायना ! ”

“ खरंच्. इंदूच्या घरीं जाण्यास हपापून भलत्याच ठिकाणाला बड-नेरा समजून उतरूं नकोस ! .... ....”

“ भलत्याच स्टेशनवर आम्ही ढीग उतरूं. पण बापू आम्हाला न्यायला भलत्याच स्टेशनवर कसा उगवेल ? ” इंदू विजयी मुद्रेनें म्हणाली.

अशाच गप्पा चालल्या होत्या. एक दोघीजणी तर प्लॅटफॉर्मवर उतरून व नमस्कार चमत्कार करून सांगत होत्या कीं परत कोठच्या गाडीनें व केव्हां जाणार तें जरूर जरूर कळवा. त्यांना उद्देशून डब्यांतील एकजण म्हणाली–“ सिंधू, डब्यांत चढ बरं. नाहीं तर तुझा भंडारा होईल येथेंच! ”

“ इतक्या कांहीं आम्हीं बावळट नाहीं समजलीस.... ” पण इतक्यांत गार्डाची शिट्टी झाली व त्या डब्यांत शिरल्या देखील. गाडी चालूं लागली तशा खिडक्यांतून बहुतेक मुली कुणी रुमाल

फडकावीत तर कोणी नमस्कार करीत, कुणी कांहीं मोठयानें ओरडून इंदूचा व डायनाचा निरोप घेत होत्या. डायना "Wish you happy journey"(तुमचा प्रवास सुखकर होवो.)म्हणत. तर इंदू उजवा हात आशीर्वाद दिल्याप्रमाणें उंच करून, "शुभास्ते पन्थानः सन्तु" म्हणत गंभीरपणाचा उसना आव आणीत, त्यांचा निरोप घेत होत्या. पांचदहा क्षणांत गाडी व तिच्या बरोबर इतक्या जणींचे हंसरे आनंदी व निष्कपट चेहरे काळोखांत विरून गेले....

"कण्वाचा पार्ट विसरून जा आतां इंदूताई !"

"आमच्या इंदूनें?, आणि कण्वाचा पार्ट केला होता म्हणतां ! केव्हां तो."

"अहो केला नाहीं अजून. वनिता समाजाच्या वाढदिवसाला करणार आहे ती."

"बायकांच्या तोंडांत तीळ सामावत नाहीं म्हणतात, तें फक्त आमच्याच बाबतींत खरें असें मला वाटत असे. पण तो समज एकंदरींत चुकीचाच तर" थोडया वेळानें मला उद्देशून:——
"I thank you very much–So obliging of you Bapu! ( मी तुझे फार आभार मानत्ये, फार उपकारी आहें, बापू ! ) काल रात्रींच आला असशील इथं."

"होय." हमालास उद्देशून "सामान वेटिंग रूममध्यें घेऊन ये हं." एकदोन क्षणांतच इंदूस——"तुमचे डाग किती आहेत ते माहीत आहेत ना ? नाहींतर मी पाहतों. चला तुम्ही वेटिंग रूमकडे."

कांहीं वेळानें आम्ही वेटिंग रूममध्यें जाऊन तेथील बांकावर पहुडलों, पण खरी झोंप कोणालाच आली नसेल. आम्हाला सकाळ-

पर्यंतचा वेळ कसा तरी काढावयाचा होता एवढेंच. ६॥ च्या सुमारास आमचीं तोंडें धुणें, चहा पिणें वगैरे विधी संपले व मी निघण्याची तयारी करूं लागलों. तेव्हां इंदी म्हणते कशी—"एवढी घाई कशाला बापू, आम्ही जरा तोंड धुवून वेण्या घालून येतों. नाहींतर माई ( माझ्या वहिनी ) म्हणेल कीं आल्या दोघीजणी कंजारणी, मारे मोटारींत बसून ऐटीनें ! "

" बरं बुवा, तुझेंच चालूं दे....बालगंधर्व स्टेजवर येण्यापूर्वीं जितका वेळ नटण्यामुरडण्याला लावतो तितका लावा ! माझी कांहीं हरकत नाहीं....पण थोडा जास्ती उशीर झाला तर वहिनी जाईल घाबरून, आणि म्हणेल कीं भावोजींनीं केली मोटार उलथी पालथी!"

" एवढेंच ना ? आम्ही शाबूद दिसल्यावर होईल तिची खात्री बरं! "

सुमारें १०।१५ मिनिटांत इंदू—डायना यांचा नेपथ्यविधी उरकल्यावर आम्ही स्टेशनाबाहेरच्या आवारांत ठेविलेल्या आमच्या मोटारीकडे आलों. तेव्हां डायना म्हणाली—" अग इंदू, बडनेच्याहून आगगाडीनेंच ना जातात उमरावतीला ? मग मोटारींतून आपण कुठें जायचें आतां ? "

" आपण कुठें म्हणजे ? अहा ग वेडे....आपण चाललों पुण्यास आतां...."

" चहाटळ कुठची ! जेव्हां तेव्हां कसली ग तुझी थट्टा ही ?"

" अग नेहमीं आगगाडींतूनच मंडळी जाते येते, उमरावतीला. मी सुद्धां बहुधा नेहमीं आगगाडीनेंच येतें—जातें. पण ह्या खेपेस बापू आला असेल नुकताच मुंबईहून, तेव्हां त्याच्या मोटार—ड्रायव्हिंगची ( हांकण्याची ) परीक्षा घ्यावयाचें आलें माझ्या मनांत !

म्हणून मी त्याला, पुण्याहून निघण्यापूर्वींच येथें मोटार घेऊन यावयास लिहिलें. त्याप्रमाणें तो आला म्हणून मी त्याला आपण उतरल्याबरोबर थँक्स देखील दिले. "

मी पुरती माहिती देण्याकरितां म्हणालों—" उमरावती आहे येथून सारी सहा–सात मैल दूर. पण इंदीच्या मनांतून तुम्हाला आमच्या येथील थाटमाट दाखवावयाचा असेल,म्हणून एवढा आमच्या-बद्दल प्रेमाचा उमाळा आला, आणि वर्षांवर्षांतून कधींहि न येणारें असें पत्र आलें आमच्या नांवानें ! आहे माहीत तुम्हांला यांतलें खरें इंगित ? "

" तर मग तुम्हाला फारच त्रास झाला असेल. येथें वेटिंग रूम-मध्यें धड झोंप देखील मिळाली नसेल.... "

" तसें कांहीं नाहीं म्हणा....पण आतां उगीच उशीर नको. बसा तुम्ही मागच्या बाजूस. "

एवढें बोलणें झाल्यावर अस्मादिकांच्या स्वारीनें मोटार सुरू केली व सुमारें १५।२० मिमिटानंतर आमची मोटार उमरावती कँप मधील मोरूअण्णा बॅरिस्टर यांच्या बंगल्याच्या पोर्चमध्यें उभी राहिली. ( पोर्च कसलें तें, पण आपलें बंगला म्हटला कीं त्याच्या दाराला ' पोर्च' शब्द आलाच म्हणावयाचा.) शकू व कावेरी मोटा-रीचा हॉर्न ऐकून ' इंदू–मावशी ' करीत धांवतच आल्या पायऱ्या उतरून, आणि मोत्या कुत्रा तर तिच्या पायांत घोंटाळत व अर्धवट डायनाच्या अंगावर गुरगुरत असा तिची पाठ पुरवूं लागला. शंकरनें (गडी) सामान घरांत नेण्यास सुरवात केली. वहिनींनीं फॉर्मल ( औपचारिक ) स्वागत करून सब्स्टॅन्शियल ( भरींव ) स्वागत करण्याकरितां पाय उचलला, आमच्या स्वारीनें मोटार तबेल्यांत नेण्याची खटपट केली !

चार पांच मिनिटांतच पुन: आम्ही आमच्या हॉलमध्यें जमा झालों. थोडयाच वेळांत चहा पण आला. कावेरी इंदूला चिकटूनच पण डायनापासून दूर अशी होती, व मधूनमधून हळूंच चोरून तिच्याकडे पाहात होती. शकू आपली मजजवळच येऊन बसली. कपबशांतून चहा ओतून वहिनींनींच आज सर्वांना दिला. तो हातांत आल्यावर डायना म्हणाली " ये ग कावेरी, थोडा चहा देतें ना मी...."

" ती चहा घेत नाहीं मुळींच. आम्ही सर्व मुलांना दूध देतों प्यायला " वहिनी म्हणाल्या.

थोडक्याच वेळांत शकू माझ्या कानांत म्हणते कशी—"काकाऽ डायना मड्डम आहे का हो ?"

मला धड हंसतांही येईना व गुपचुप बसतांही येईना ! तिच्या प्रश्नास कांहीं तरी उत्तर देणें जरूर होतें, तेव्हां मी तिला हळूंच म्हटलें तिलाच विचार तूं." त्यावर ती चट्कन म्हणाली—"हट् आपण नाहीं विचारीत बुवा."

पण इंदीचें लक्ष आमच्या हालचालींकडे गेलें व तिनें विचारिलें—" काय ग शके, काय चालल्याहेत कानगोष्टी बापूंजवळ ?"

" कांहीं नाहीं...." लाजत घुटमळत, पण जलदीनें असें तिनें उत्तर दिलें.

" कांहीं नाहीं कसें, सांगू का काय म्हणत होतीस तें...."

अगदीं काकुळतीस येऊन " असं काय करतोस रे काका....तूं सांगितलेंस तर शप्पत आहे तुला, रामाऽची."

" खरेंच कीं काय, आम्हांला शप्पत बिप्पत कांऽऽहीं कळत नाहीं. सांगाच हो तुम्ही बापूसाहेब " डायना म्हणाली.

मला देखील शकूची चेष्टा करण्याची इच्छा अनावर होऊन अखेरीस मीं शकूचा प्रश्न भर सभेंत टाकला. त्यावर शकूखेरीज इतर मंडळी खदखदां हसूं लागली. पण शकू बिचारी चिमणी-सारखें तोंड करून व माझ्यावर जळफळत अशी कोंपऱ्यांतील कोंचावर जाऊन रडूं लागली.

हा सर्व प्रकार चालला आहे तोंच मोरूअण्णा सहजच म्हणून डोकावले. नंतर त्यांनीं थोडी समजूत घातल्यावर शकूची तब्बेत निवळली.

तो सबंध दिवस प्रवासाचा शीण घालविण्यांत गेला, तरी देखील तेवढया अल्प स्वल्प काळांत इंदू–डायना यांनीं सर्व माणसांना एक प्रकारें भारून टाकून घरांत नवचैतन्य उत्पन्न केलें.

*        *        *

मी, इंदू, डायना अशीं १९२७ च्या दिवाळीच्या सुट्टीनिमित्त उमरावतीस आलों होतों. मी मुंबईस ग्रँट मेडिकल कॉलेजांत होतों, व इंदू पुण्यास हुजूरपागेंत इंग्रजी सहावींत होती. इंदूचे आईबाप पुण्यास इन्फ्ल्युएन्झानें वारल्याकारणानें ती आमचे घरींच राहावयास आली होती; व तिच्या साहव्या–सातव्या वर्षापासून आमचें घर तेंच तिचें घर झालें होतें. आमच्या वहिनींना पुण्याचा व हुजूरपागेचा फार अभिमान; म्हणून इंदू, अलीकडे तीनचार वर्षे येथील शाळेंत न जातां पुण्यास हुजूरपागेच्या बोर्डिंगांतच राहात असे. बाकी वहिनींनीं नाहीं तिचे लाड किंवा हट्ट पुरविले तर दुसरें कोण पुरवणार?

डायना ही खरें म्हटलें तर, स्वतःच्या घरींच जावयाची; पण इंदूनें तिला फार आग्रह करून घरीं आणलें होतें. बाकी 'फार आग्रहा'ची विशेष जरूर होती असें नव्हे. आदल्याच वर्षी त्या दोघींत घरच्या

मंडळींच्या सम्मतीनें करारमदार होऊन इंदू प्रथम तिच्या घरीं गेली होती. आतां ह्या दिवाळींत डायनानें आमचेकडे येणें क्रमप्राप्तच होतें.

ह्या दोन भिन्नधर्मीय मुलींत इतका दृढ स्नेहभाव कसा जमला व त्यांच्या घरच्या मंडळींनीं देखील त्यांना एकमेकींच्या घरीं जाऊन महिना महिना राहण्यास कशी परवानगी दिली याचें पुष्कळ जणांस कोडेंच पडेल. इतरांस काय, पण मला स्वतःला देखील गेल्या वर्षी, मोरूअण्णा व वहिनी यांनीं इंदूला डायनाच्या घरीं पाठविलें ह्याबद्दल फार वैषम्य वाटलें होतें. कारण तोंपर्यंत डायना ही ‘ काळी का गोरी ’ कोणाला माहीत होती ? बरें एक डायना उत्तम आहे अशी कल्पना केली तरी तिच्या घरची इतर मंडळी कशी असेल कोण जाणें. अशा परिस्थितींत इंदूसारखी भाबडी, अननुभवी, पण वयांत आलेली, पोरकी मुलगी मोरूअण्णानीं दूर कशी पाठविली याचें मला आश्चर्य वाटत होतें. पण ह्या सर्व इतर अडचणींखेरीज अन्नव्यवहाराची मला फारच मोठी अडचण दिसत होती ! पण त्या वेळीं मीं आपला विचार केला कीं मोरूअण्णा व वहिनी जाणत व इंदू जाणें ! आपण कशाला त्या नसत्या भानगडींत पडा !!

आमचे अण्णा दुपारीं जेवून कोर्टांत गेल्यावर व कावेरी–शकू शाळेंत गेल्यावर आम्हांला सर्व घर मोकळेंच असे ! वाटेल तर झोंपा काढाव्या, अगर खेळावें; वाचावें अगर ग्रामोफोन–पेटी बडवावी ! अभ्यासाचें नांव नको. सकाळच्या वेळीं इतकी मोकळीक आम्हाला सांपडत नसे. कारण निजून उठणेंच मुळीं सातच्या बेताला. त्याचेपुढें प्रातर्विधी वगैरे, आणि स्नानें, जेवणीं. जेवणाचा बेत लवकरचा म्हणजे दहाचा असल्यामुळें आणि सर्वांनीं एकत्र भोजन करण्याबद्दलचा अण्णांचा सक्त

नियम असल्यामुळें आमची धांदल उडे. त्यांत पक्षकाराची ये–जा. म्हणून सकाळची वेळ केव्हांच भुर्रकन् उडून जात असे. संध्याकाळीं चहापाणी झाल्यावर पांचपर्यंत जर मोटार मोकळी असेल तर आम्ही लांब कोठें तरी गाडींतूनच जात असूं; नाहीं तर मग कोठें तरी पायींच तीन चार मैलांची चक्कर करीत असूं. अशा प्रकारें, बहुधा, आम्ही आमचे दिवस घालविले.

इंदू पुण्याहून आल्याच्या दुसऱ्याच दिवशीं दुपारीं दोनची वेळ होती, व आम्ही पत्ते खेळत होतों. डाव ऐन रंगांत आला होता, इतक्यांतः—" बस्स ! आम्ही नाहीं डाव देत परत. डायनाचा पंजा कव्हर केला गेला, आतां हात कसा परत मिळेल ?" असें मी म्हणालों.

" अरे, पण डायना इतकी का दुधखुळी आहे, कीं तुझ्या राजावर एक्का टाकून हात घेणार नाहीं ?"

" दुधखुळी आहे कीं नाहीं तें दिसतच आहे म्हणा ! नाहीं तर तिनें एक्का टाकला नसता काय?"

" तुझ्या हातून खेळतांना कधीं चूक होत नाहीं वाटतें? मनांतून एक पान टाकावयाचें असतें, तर हातून एकादे वेळीं भलतेंच पडतें चुकून !"

" तें कांहीं आम्ही जाणत नाहीं. आम्ही हात देणाऽऽर नाहीं."

" असं काय करता, भावोजी; द्या ना बापडा हात. "

" तुम्ही आहांत 'डमी', वहिनी. तुम्हाला शब्द काढायचा अधिकार नाहीं."

" तें खरें. आतां कनी, येथें आम्ही तिघी आहोंत बायका !....."

" मग काय संगनमत करून मला बडवून काढायचा विचार करतां कीं काय !...."

“तसें नव्हे भावोजी, हो. हट्ट करायचा खरा हक्क आहे आमचा, आणि शिव्हल्री—स्त्री दाक्षिण्य दाखवून तो आमचा हट्ट पुरविण्याचा मान तुमचा! तेव्हां जाऊं द्या झालं. होईना का इंदीच्या मनासारखें.”

“तसें काय म्हणून हवय् आमच्यावर उपकाराचें ओझें! एवढा उपकार नको कांहीं आमच्यावर. चालूं द्या पुढें डाव, अजून पुष्कळ उरला आहे........”

“एवढा जोर होता तर पहिल्यांदाच मागितला कशाला डाव परत?”

“एवढें भांडतेस कशाला इंदू. मी होतें जरा absent minded (गैरसावध) म्हणून एवढा घोंटाळा झाला. पण हा हात बुडला तरी कांहीं हरकत नाहीं. अजून आपण त्यांचे ‘डबल’ करूं! (हात बुडवूं) खेळ तर सुरू होऊं द्या.”

“डबल करणारांचें तोंडच दिसतें म्हणा” असे शब्द माझ्या तोंडांत अगदीं जिभेवर आले होते, पण मी चपापून :—“बरं बरं, पाहतों आम्हीं कसे ‘डबल’ होतात तें.” एवढेंच म्हणालों.

हा ‘ब्रिज’चा डाव ज्यांस कळत असेल, त्यांस वरील संवादावरून एकंदर डावाची कल्पना आली असेल; पण ज्यांस तितकी चाणाक्ष बुद्धि नसेल त्यांच्याकरितां मी आणखी थोडीशी माहिती देतों.

वहिनी व मी हे आणि इंदू व डायना असे पार्टनर (भिडूभिडू) होतों. वहिनी ह्या ‘डमी’ होत्या, व अर्थात् माझा कॉल स्टँड झाला होता. (वहिनींचीं पानें उघडीं असून त्या खेळांत असून नसून सारख्याच होत्या, व मी मुख्य खेळणारा होतों.) वहिनींच्या डाव्या हातास इंदू व उजव्या हातास डायना असे आम्हीं खेळावयास

बसलों होतों. प्रथम ( डावाच्या मध्येंच, एका हाताच्या सुरवातीस ) इंदू बदामचें एक कायसें हलकेंच पान खेळली होती. वहिनींच्या उघडया डावांत बदाम 'राणी' व इतर तीन पानें होतीं, मजजवळ राजा, गुलाम, व आणखी एक अशीं म्हणून मी राजा टाकला होता, पण डायनानें त्यावर एक्का टाकून हात घेण्याऐवजीं तो हात सोडून दिला होता. तो हात न घेतल्यामुळें इंदू–डायना यांचा मोठासा तोटा झाला होता अशांतला भाग नव्हे, पण इंदू आपली उगीच तावातावानें भांडली झालें !

तो डाव संपला. व डायनानें खरोखरच आमचे हात बुडवले. पण जर कां तिच्या म्हणण्याप्रमाणें आमचे हात बुडाले नसते तर मात्र पुन्हां एकदां वर दिलेला वाद उकरून निघाला असता, व कदाचित् आमच्या इंदूताईंनीं डायनावर absent mindness (गैरसावधपणा ) बद्दल खूप ताशेरा झाडला असता !

ह्या भांडणामुळें आम्ही आपला डाव लवकरच संपविला. पण डाव संपल्यावर वहिनींना घरांतील कांहींतरी कामेंधामें होतीं म्हणून त्या तिकडे निघून गेल्या व आम्ही तिघेजणच दिवाणखान्यांत शिल्लक राहिलों. तेव्हां आमच्या थोडया किरकोळ गप्पा झाल्या. एवढयांत डायना इंदूला म्हणाली–" खरंच बरी आठवण झाली. काल तूं कबूल केलें होतेंस कीं उद्यां लुगडें नेसावयास शिकवीन म्हणून. तर चल आतां. संध्याकाळीं कावेरी–शकू आल्या कीं त्यांना अशी surprise (चकीत) करतें कीं ज्याचें नांव तें.–म्हणे डायना मड्डम आहे कां ?........"

" म्हणजे!! तुम्ही आतां आमचा पेहेराव करणार वाटतं ! मला वाटलं कीं आमच्या घरांत आतां महिनाभर 'मेमसाहेब'च राहणार आहांत........"

"तुम्ही तरी खूप दिसतां हो! आम्ही काय जन्मभर झगेच वापरतों अशी तुमची समजूत आहे वाटतें? आम्ही नांवाचे 'साहेब'. आहोंत. घरीं बहुतेक रीतरिवाज आहेत आमचे, तुमच्यासारखेच...."

"तरीच तुमची मराठी भाषा इतकी शुद्ध येते. मला प्रथम वाटलें कीं ही तुमची मराठी बोलण्याची संवय हुजूरपागेंतीलच असावी."

"डायनाचे पंजोबा का कोणसे म्हण प्रथम बाटले. सध्यां त्यांच्या घरीं मांसाशन बहुधा रद्द केलेलें असावें, कारण मी होतें तोंपर्यंत जवळ जवळ हिंदू पद्धतीप्रमाणेंच त्यांचा स्वयंपाक असे. घरची बहुतेक मंडळी मराठी उत्तम बोलते. पुरुषांचा पोषाख साहेबी पद्धतीचा असतो, पण बायका मात्र पार्शी पद्धतीप्रमाणें लुगडीं नेसतात...."

"मी देखील आतां साडयाच नेसावयास लागणार आहें. दोन रेशमी साडया मजजवळ आहेत देखील, पण अजून धड नेसतां येत नाहीं म्हणून मी आपली झगेच वापरते झालें. आईनें मला धाक घातला आहे कीं आतां नवीन झगाच घ्यायचा नाहीं, तेव्हां कांहीं उपायच राहिला नाहीं. म्हणून येथें असे तोंपर्यंत आमच्यासारख्या साडयाच काय पण तुमच्यासारखीं लुगडीं देखील नेसावयास शिकण्याची माझी इच्छा आहे........"

"बरें. मग चल ना. आतां गप्पा मारीत बसायला वेळ नाहीं" असें म्हणत इंदूनें तिला आपल्या खोलींत ओढीतच नेलें.

*　　　*　　　*

डायना—इंदू यांना घरीं येऊन चार पांच दिवस होऊन गेले होते. ह्या इतक्या अवकाशांत तिनें लुगडें नेसण्याची साधारण बरी तयारी केली होती. आजच प्रथम लुगडें नेसून बाहेर फिरावयास जाण्याचा आमचा बेत होता. तेव्हां जरा जास्त चापून चोपून व

इकडे तिकडे सेफ्टी पिना वगैरे लावण्यांत तिचा बराच वेळ गेला. इंदू—डायना यांची तयारी झाली तेव्हां ( ह्याच कारणामुळें उशीर झाला होता, ) म्हणून जवळच मालटेकडीवर फिरावयास जाण्याचें ठरवून आम्ही तिकडेच गेलों.

माल टेकडी बेताबाताचीच उंच आहे म्हणून आम्ही ती चढून वर गेलों होतों. अर्थात् वर गेल्यावर थोडीशी विश्रांति घेण्याकरितां म्हणून व संध्याकाळची हवा खाण्यासाठीं म्हणून आम्ही बसलों. आमच्याबरोबर शकू तेवढी होती, कावेरी धाकटी आणि तिला कदाचित् टेंकडी पुरती चढतां यावयाची नाहीं म्हणून, तिला आणली नव्हती. मंडळी बसल्यावर प्रथम टेंकडीखालच्या रस्त्याची व इतर शहराची शोभा पाहण्यांत तसेंच त्यासंबंधीं गप्पा मारण्यांत आमचा कांहीं वेळ गेला. पण थोडक्याच वेळांत मैत्री या विषयावर आमचें संभाषण सुरू झालें. प्रथम प्रथम मित्र जास्त असावेत कां थोडे असावेत, निरनिराळ्या जातींचे व स्त्री—पुरुष असे असावेत, कां स्त्रिया—स्त्रिया यांचा एक गट व पुरुषांचा एक गट असे असावेत....वगैरे. पण हा सर्व तात्त्विक वादविवाद आम्हाला झेंपला देखील नसता. म्हणून त्याला निराळें वळण देण्याकरितां, तसेंच मला अलीकडे जी एक डायनासंबंधीं माहिती मिळविण्याची उत्कंठा अगर जिज्ञासा होती ती भागवून घेण्याकरितां म्हणून, मी बोलण्याचा ओघच बदलला. "पुष्कळ वेळां आपणांस, आपल्या मित्रांची प्रथम ओळख कशी झाली तें आठवत नाहीं. मैत्री होण्याचीं कारणें फार मजेदार असतात. मला अशीं तीन चारच मित्रांच्या बाबतींतलीं, आठवतात. बाकीचीं नाहींत. तुमची आपसांत प्रथम मैत्री कां जुळली तें आठवतें का?"

"मला नाहीं आठवत बा. तुला आठवतं का ग?"

"न आठवायला ग काय झालं! आपण चवथींत असतांना 'फ्लेशन्'मध्यें (फ्ले शेड—Play shed—चा अपभ्रंश—खेळण्याची पडवी) हुतूतू खेळतांना तुझा गुढघा फुटला तेव्हां इतर मुली घाबरल्या. पण मीच धांवत जाऊन 'नर्स'बाईंना घेऊन आल्यें व तीन चार दिवसांत तुझा पाय बरा झाला........"

"खरंच, खरंच. तेव्हां तूं नुकतीच शाळेंत आली होतीस, आणि मी नवीन मुलगी असून देखील तूं माझ्या उपयोगी पडलीस म्हणून मग मी तुझ्याशीं जास्त बोलूं चालूं लागल्यें. खरंच........"

"मला देखील कोणाशीं तरी जास्त ओळख करावयास पाहिजेच होती. कारण लिझी (थोरली बहीण) चें माझें जमणार कसें?"

"आपली गट्टी झाल्यावर प्रथम प्रथम संध्याकाळचे वेळीं तर आपण दोघीजणी अगदीं गळ्यांत गळे घालून 'बदाम' बागेभोंवतीं हिंडत फिरत असूं....."

"तुमची हकीगत तर रोमँटिक् (चमत्कृतिजनक) आहे बुवा! माझ्या बहुतेक आठवणी अगदीं साध्या आहेत."

अशाच प्रकारें ती संध्याकाळ घालविली.

त्या दिवसानंतरही आणखी तीन चार दिवस निघून गेले असतील. एके दिवशीं सकाळीं कावेरी व शकू यांच्यांत स्वयंपाकघरांतच कांहींसें भांडण झालें. इतर मंडळींचा चहा वगैरे झाल्यावर त्यांचें दूध पिणें देखील झालें होतें. पण तो दिवस रविवार अगर सुट्टीचा असल्यामुळें जेवणें उशीरां व्हावयाचीं होतीं. म्हणून त्यांना खाण्याकरितां घावन् अगर पानग्या किंवा असेंच कांहीं तरी केलें होतें. तें खात असतांना 'हिलाच कां मोठी ताटली, मला ती ताटली

हवी' असें शकू म्हणाली. तें त्यांचें भांडण कसेंबसें मिटलें गेलें होतें. पण एक घावन् का पानगी (कांहीं तरी) खाऊन झाल्यावर दुसरा तयार झाला होता, तो तव्यावरून काढून व त्याचे तुकडे करून गुजराथी त्यांचेपुढें वाढावयास गेला.

कावेरी ओरडली 'चंदूलाल तो तुकडा मला पाहिजे.'

शकू म्हणाली 'नाहीं रे मलाच वाढ तो. मला कुरकुरीत पदार्थ आवडतात. तो चांगला खमंग असेल.'

"कावेरी पुन्हां ओरडली 'हें काय ग शके! मघाशीं मोठी ताटली तुलाच मिळाली, त्या वेळीं मला गप्प बसावें लागलें. आतां मात्र मी नाहीं ऐकणार! मलाच वाढ रे. नाहीं तर आईला सांगेन.' त्यावर चंदूलाल म्हणाला—"असं काय करता जी! कावेरीबाई मी तुम्हांला दुसरा आणून वाढतो!"

इतक्यांत वहिनी तेथें गेल्या. त्यांचें भांडण तसेंच पुढें वाढत चाललेलें पाहून त्या देखील जरा चिडल्याच होत्या. म्हणून त्यांनीं दोघींनाही चांगले धपाटे मारून त्यांच्या भांडणाचा निकाल लावून टाकला. खाणें पिणें झाल्यावर व आंचवणें झाल्यावर कावेरी--शकूनीं एकमेकींची गडी फू करून व डोळयाच्या पांपणीचे केंस उपटून एकमेकांच्या आंगावर उडवून नंतर त्या आमच्या खाजगी दिवाण-खान्यांत आल्या. मी त्या वेळीं एका प्रशस्त अशा खुर्चीत कसलेंसें मासिक—कादंबरी घेऊन बसलों होतों; डायना चिपळूणकर आणि मंडळीनें प्रसिद्ध केलेल्या 'भारत-भागवत' वगैरे ग्रंथांपैकीं कोणचेंसें एक लठ्ठ पुस्तक घेऊन बसली होती, व इंदू बहुधा आपल्या खोलींत वेणीफणी करीत असेल. कावेरी मजजवळ आली व लाडीगोडी करूं लागली, आणि शकूनें डायनाचा आश्रय धरला. त्या दोघींचेंही

एकमेकींकडे पाहणें व चिडवून हातवारे करणें सुरू झालें; आणि असें चालूं असतांना त्या हळूहळू आपल्या भांडणाची हकीगत सांगूं लागल्या. शकू आपल्याकडून कसून प्रयत्न करीत होती कीं तिच्या हकीगतींतील एक अक्षर देखील माझ्या कानीं येऊं नये. पण तिचें बोलणें कांहीं तितकें हळू नसल्यानें तिची हकीगत देखील माझ्या कानांवर आलीच. अर्धवट माहिती लागतांच मी डायनाला म्हणालों,

"आतां आपणाला ह्या मुलींचे पक्ष घेऊन भांडावें लागणार बहुतकरून! कारण जर आपण भांडलों नाहीं तर ह्या आपल्या-जवळ पुनः म्हणून हितगुज करावयास येणार नाहींत! मग आपल्या-शींच गडी फू करून पुनः एक व्हायच्या लबाड!!"

विशेषतः माझ्या शेवटच्या उद्गारांनीं कावेरी व शकू या खुदू-कन हंसल्या व त्यांजमधील समेटाचीं चिन्हें उदय पावूं लागलीं. मी हा समेटाचा उदय करून दिला तर तो पूर्ण दिसावयास लावण्याचें श्रेय डायनानें आपल्याकडे घेतलें. ती कावेरीस म्हणाली—"इकडे येतेस का, कावेरी मी तुला छान छान चित्रें दाखवते ह्या पुस्तकां-तलीं. कशीं रंगीत व छान आहेत!"

चित्रांचें नांव काढतांच, कावेरी, लोखंड ज्याप्रमाणें लोहचुंबका-कडे खेंचलें जातें तद्वतच डायनाकडे धांवत गेली. कावेरीस चित्रांची फार आवड होती; आणि तिच्या पुस्तकांतील बहुतेक चित्रें ती रंगाच्या कांड्यानीं रंगवीत असे. कित्येक वेळां हे तिचे रंगवण्याचे प्रयत्न बेढब दिसत तर कधीं कधीं ते बरेही दिसत.

डायनाजवळ हरिवंशपर्व असावें, कारण कांहीं वेळानें डायनानें एक चित्र पाहण्यास मला देखील बोलाविलें. हें चित्र रुक्मिणी स्वयंवरापूर्वीचें असून त्यांत श्रीकृष्ण तिला रथांत घालून पळवून नेत

आहेत असा देखावा आहे. मी त्या मंडळीजवळ गेल्यावर तें चित्र मला दाखवून डायना म्हणाली " ह्या चित्रांत, ज्या देवळाच्या पुढून कृष्ण रुक्मिणीस पळवून नेत आहे तेंच देऊळ, परवां आपण पहावयास गेलों होतों नाहीं ? "

" होय. त्याच अंबाबाईच्या देवळासमोरून श्रीकृष्णांनीं रुक्मिणीस पळविली अशी आख्यायिका आहे. "

" असें असेल तर हें चित्र कांहीं फार कुशलतेनें काढलेलें दिसत नाहीं. फक्त पायऱ्या चढून वर यावें लागतें हें मात्र चित्रकारानें बरें दाखवलें आहे. "

" आणखी एक मजा पाहिलीत का ? कोणच्याशा नाटकांत म्हणे पद आहे कीं

'रुक्मिणी गोरटी, कृष्ण काळा
सांवळा वर बरा, गौर वधुला "

पण आमच्या ह्या चित्रकारानें रंगाची उलटापालट करून 'कोणी तरी एक काळें व एक गोरें' एवढें लक्षांत ठेवून कृष्ण तेवढा गोरा करून रुक्मिणीला बिचारीला काळी केली आहे ! "

त्या चित्रावर आणखी आम्ही पुष्कळच गप्पा मारल्या असत्या, पण आम्हास कावेरी—शकू तसें करूं देतील तेव्हां ना !—

त्याच दिवशीं केव्हां तरी हीं पुराणांचीं पुस्तकें वाचण्याबद्दल डायनाला इतकी उत्सुकता कां असावी म्हणून मी तिजजवळ चवकशी केली होती तेव्हां तिनें उत्तर दिलें कीं—'बायबलबद्दल जसें तुम्हांस कुतूहल असतें ; तद्वतच आम्हांला देखील हिंदू देवादिकांबद्दल फार आदर असतो.' अस्सल माहिती मिळण्याकरितां म्हणून तीं पुस्तकें आढळल्यावर वाचण्याचा तिला मोह झाला होता.

एक दिवस संध्याकाळीं, इंदू—डायना ह्या फिरावयास आल्या नव्हत्या. मी सहज आयर्विन हॉस्पिटलच्या आजूबाजूंच्या 'डांबरी' रस्त्यांवरून स्टेशनपर्यंत जाऊन परत आलों. आमच्या बंगल्याच्या फाटकांतून आंत शिरतों तों संगीत ऐकूं येऊं लागलें. बालगंधर्वांच्या 'आशानिराशे' मधील 'दिलरुबा हा या जिवाचा....' हें पद चालू होतें. माझ्या जाण्यामुळें कदाचित् संगीत बंद पडायचें म्हणून मी तसाच बंगल्याच्या आवारांतील झाडाझुडपांशीं खेळत पण गाणें ऐकत वेळ घालविला. तें पद डायनाच म्हणत होती व पेटी, बहुधा इंदू वाजवीत असावी. पद संपल्यावर आणखी थोडा वेळ थांबून दुसरें गाणें सुरू होत नाहीं अशी खात्री झाल्यावर, मी आंत गेलों. तों इंदू पेटीवरून उठली नव्हतीच ! डायना तिच्याजवळ बसली होती व वहिनी आणि कावेरी—शकू अशाच इकडे तिकडे होत्या.

" कां, आम्हाला नाहीं वाटतं संगीत ऐकवायचं. कां टेस्टच ( Taste ) नाहीं आम्हांला ? "

" तसें नव्हे हो. चांगलें येत असतें तर कोण कशाला लाजलें असतें ? "

" मग म्हणा ना एकदां 'दिलरुबा हा....'

" म्हणजे तुम्ही ऐकलं वाटतं, चोरून आमचें गाणें ? असें करणें चांगलें नव्हे ! "

" आपल्या जवळची कला लपवून ठेवणें तरी चांगलें का ? अशानें कलेची वाढ तरी कशी व्हायची ? आपणांस येत असेल तें लोकांस दाखवावें, त्याजकडून अभिप्राय ऐकावा."

" बरं रे ! तूं आपला व्याख्यान द्यावयास लागला ! थांबलास तर म्हणणार नाहीं का ती दुसरें एखादें ! "

“ बरं बुवा. हें पहा. तोंडाला कुलूप. ” असें म्हणून मुद्दाम ओंठ घट्ट आंवळून धरले. माझा तो विकृत चेहरा पाहून मंडळी हंसावयास लागली व गाणें तितकेंच थांबलें !

अशाच प्रकारें आमचे दिवस फार मजेंत गेले व आम्ही पुन्हां आपल्या व्यवसायांत गढून गेलों.

* * *

१९२८ साल अखेरचे दिवस. मी नाताळांत उमरावतीस गेलों होतों. माझ्या लग्नाच्या देखील गोष्टी सुरू झाल्या होत्या, व कांहीं मुली पाहिल्या देखील होत्या. पण त्यांतील कोणतीच पसंत केलेली नव्हती. (मी एकही पाहिली नव्हती, वहिनी व अण्णांनींच पाहिल्या होत्या.) एक दिवस सहजच कावेरी का शकू, कोणशी मला म्हणाली ‘ तुझें लग्न केव्हां होणार काका ? ’

“ कां ग विचारतेस ? ”

“ मला नवीन जरीचा परकर शिवायचं आईनें कबूल केलें आहे. ”

“ हात्तिच्या ! एवढंच ना. मी तिला सांगतों आजच शिवून द्या म्हणून. ”

“ नाहीं पण....खरंच, काका केव्हां होईल रे तुझें लग्न ? ” शकू म्हणाली.

“ अग मुलीच नाहीं येत सांगून मुळी ! तर लग्न कसें करायचं ? ”

विचारावें कां विचारूं नये असा विचार पडल्यामुळें, कांहीं वेळ थांबून, कावेरी म्हणाली—“ मुली नसायला काय झालं रे काका; अण्णा व आई नेहमीं मुली पहायला जात असतात....पण कोणीच नाहीं मिळाली तर आपली डायना नाहीं कां सुरेख....”

वहिनी जवळच होत्या त्या ओरडल्या "हा गाढवी ! बरीच चहाटळ आहेस कीं ?" नंतर माझ्याकडे वळून "कां भावोजी विचारांतसे पडलांत् ? द्या कीं उत्तर आपल्या पुतणीला ?"

मी कांहीं न बोलतां निमूटपणें खोलींतून निघून गेलों. कावेरीच्या त्या प्रश्नानें आजपर्यंत ज्या विषयाचा मी यत्किंचित्‌देखील विचार केला नव्हता त्या आयुष्यांतील महत्त्वाच्या प्रश्नासंबंधीं माझे डोळे खाडकन् उघडले. हा वेळपावेतों मी माझी भावी सहचारिणी उघडकीस आणण्याचें काम अण्णा—वहिनींवर सोंपविलें होतें तें तसेंच त्यांजकडे राहूं द्यावें कीं तें आपणच स्वत: पहावें असा देखील एक विचार डोक्यांत आला. पण जरी एकादे वेळेस योग्य अशी मुलगी आपणांस प्रथम आढळली तर तिच्याशीं लग्न करावयास परवानगी न देण्याइतके अनुदार मताचे माझे अण्णा नाहींत, ही खात्री असल्यामुळें मी तो त्यांनीं घेतलेला अधिकार तसाच त्यांजजवळ राहूं देण्याचा बेत केला.

आजपर्यंत माझी भावी वधू म्हणून मजपुढें एक देखील मुलगी नव्हती. कॉलेजांत पुष्कळच विद्यार्थिनी असल्याकारणानें त्यांच्यापैकीं कांहींची ओळख साहजिकच झाली होती. तसेंच इतर नात्याच्या व ओळखीच्या मुली देखील होत्या. पण ह्या इतक्या परिचयाच्या मुलींपैकीं एकाही मुलीबद्दल ती आपली भावी बायको अशा प्रकारचें प्रेम मला वाटत नव्हतें. नाटक-कादंबऱ्यांतून अगर आचरट विद्यार्थ्यांच्या (खरोखर ते आचरट आहेत का, हा देखील प्रश्न आहे.) वर्तनांतून ज्या प्रेमाचीं चित्रें दिसतात; तसल्या प्रकारचें प्रेम कोणच्याही स्त्रीवर करण्याची माझी तयारी झाली नव्हती. थोडक्यांत सांगावयाचें तर "प्रेम 'सब्झूट'

आहे " असें म्हणणारा मी एक होतों. पण असें म्हणणें एवढीच त्या संबंधाची माझी जबाबदारी असें समजणारा मी नव्हतों. आपणास प्रेमाची ओळख पटते काय म्हणून प्रेमाच्या मागें लागणाऱ्या सुप्रसिद्ध कवि शेलेचा कांहीं तरी क्षुल्लक अंश माझ्यांत उतरला होता; व त्या दृष्टींनीं मी अलीकडे एक--दोन वर्षे प्रयत्न देखील केला होता. मी बरोबरच्या स्त्रियांत निःसंकोचपणें वागण्याचा व त्यांच्यांत मिसळण्याचा प्रयत्न करीत असें; पण त्यांच्यांतील कांहीं जणींनीं जरी माझ्या मनावर Impression पाडलें होतें (कायमचा ठसा उमटविला होता) तरी त्यांजवर माझें प्रेम होतें असें मला म्हणतां आलें नसतें. अशा प्रकारचा ठसा उमटविणाऱ्या स्त्रियांत तर कांहीं म्हाताऱ्या, विधवा, अगर तरुण पण विवाहित अशा स्त्रिया देखील होत्या. केवळ अविवाहित सुंदर तरुणीच नव्हत्या !

अशाच प्रकारचा विशेष ठसा उमटविणाऱ्या स्त्रियांत डायनाचा एक नंबर होता. तिच्या सहवासांत दिवस घालवावे, तिच्याशीं संभाषण करावें असें मला पुष्कळ वाटे; पण तिच्याशीं लग्न करावें कीं नाहीं ( जातीचा प्रश्न दूरच ठेविला ! ) हा प्रश्नच डोक्यांत आला नव्हता. पण तो कावेरीनें लक्षांत आणून दिल्यावर मात्र मी त्याचा विचार करूं लागलों व शेवटीं त्या बाबतींत माझें काय मत पडलें तें मी, माझ्यासारख्याच परिस्थितींत सांपडलेल्या जेन ऑस्टिनच्या 'एमा' या स्त्रीच्या शब्दांत देतों:—

Emma continued to entertain no doubt of her being in love. Her only idea varied as to how much. At first, she thought it was a good deal; & afterwards but little. She had a great pleasure in hearing Frank Churchill talked of.... she was very



६

often thinking of him, and quite impatient for a letter, that she might know how he was.....and what was the chance of his coming.....But on the other hand, she could not admit herself to be unhappy.....though thinking of him so much, and as she sat drawing or working, forming a thousand amusiug schemes for the progress and close of their attachment, fancying interesting dialouges,.... The conclusion of every imaginary declaration on his side was that she refused him. Their affection was always to subside into friendship........

[ 'एमा' ला ' फ्रँक चर्चिल बद्दल प्रेम वाटत होतें यांत शंका नाहीं; पण तें किती हाच प्रश्न होता. कांहीं वेळां पुष्कळ आहे असें वाटे, तर कांहीं वेळां अगदीं थोडें ! त्याच्याबद्दल इतरांच्या गोष्टी ऐकणें देखील तिला मौजेचें वाटे, त्याच्याबद्दल तिचे सारखे विचार देखील चालत व त्याचें पत्र आल्यास त्याची प्रकृति कशी काय आहे....तो इकडे येण्याचा संभव आहे किंवा नाहीं वगैरे माहिती मिळण्याबद्दल तिला उत्कंठा वाटत असे. पण ती दुःखी होती असें तिला कधींच वाटत नसे. तिचीं स्वतःचीं कामें अगर व्यवसाय चालू असतांना, तो आल्यास त्याच्याशीं कसें बोलावयाचें कसें वागावयाचें याचेच बेत चालत असत. पण ह्या सर्व विचारांचा शेवट देखील ठरलाच होता कीं, त्यांच्यांत **मैत्रीच** राहावयाची. जर कधीं त्यानें लग्नाची मागणी घातली तर ती नाकारावयाचीच ........]

पण ह्या विचारांपेक्षां देखील निराळयाच प्रकारचे ह्या लग्नाच्या बाबतींत माझे विचार झाले होते. "मालिनी–खान" ह्या

विवाहाच्या वेळीं निव्वळ विधर्मीय विवाह या एका कारणावर मी त्यास विरोध केला नसता. वाटेल त्या माणसानें वाटेल त्या स्त्रीबरोबर एकमेकांच्या खुषीनें विवाह करावा; (फक्त रक्ताच्या नात्याच्या स्त्रिया वर्ज्य करून) इतका देखील उदार मतवादी मी बनलों असतों! पण आजूबाजूची परिस्थिति पाहिली कीं वाटतें, नुसती ब्राह्मणाचीच काय पण तीसुद्धां कोंकणस्थच पाहिजे! स्वामी श्रद्धानंदांचा खून झाल्यावर व मुसलमान गुंड-पुरुषांची हिंदु स्त्रिया भ्रष्ट करण्याची चळवळ चालू असतांना, उच्च कुलीन पदवीधर हिंदू स्त्रीनें आपण होऊन एका मुसलमानाच्या गळयांत माळ घालावी हें मला पसंत नव्हतें.

अनेक दृष्टींनीं डायना मला अगदीं अनुरूप वधू होती; पण माझें खरें खुरें प्रेम कांहीं तिच्यावर जडलें नव्हतें! तिच्याशीं दाट परिचय व मैत्री असावीसें वाटे, पण ती बायको नसावी असें देखील स्पष्टपणें वाटे;—आणि याचें एक कारण वर आलेंच आहे. शिवाय एक दुसरा महत्त्वाचा मुद्दा राहिलाच. मला जशी डायना इतर दृष्टीनें पसंत होती तसा तिला मी पसंत पडतो कीं नाहीं, ही शंकाच होती. निदान ती ख्रिश्चन असल्यानें तिच्या दृष्टीनें तरी 'प्रेमाचा अगर पसंतीचा प्रश्न' होताच! पण हिंदू असती म्हणून काय होतें, तिला देखील आवडनावड असावयाचीच व हा तिच्या पसंतीचा प्रश्न शिल्लक राहताच.

माझ्याच ठिकाणीं जर दुसरा कोणी जरा कमी दर्जाचा इसम असता तर 'डायना' च्या निष्कपट वागणुकीचा अर्थ निराळा घेऊन व तिच्याशीं झालेल्या ओळखीचा फायदा घेऊन, कदाचित् तिच्याशीं लग्न करण्यासदेखील प्रवृत्त झाला असता. हा असला

मनुष्य नवीनच रंगभूमीवर आलेल्या वधूपरीक्षा नाटकांतल्या धुरंधर राजपुत्राप्रमाणें

“ ब्राह्मण्य सारें । रमलें तुझें ठायीं ।
धरुनि मधुर रूप । अति तोषदायि ॥ ”

वगैरे म्हणून आपल्याच मनाचें समाधान करून घेता ! पण नाटकांतल्या धुरंधराला त्रिवेणीचें त्याजवर प्रेम आहे ही पक्की खात्री तरी होती, म्हणून तो तिच्याठायीं “ ब्राह्मण्य सारें रमलें– ” वगैरे म्हणूं शकत होता. पण प्रत्यक्ष सृष्टींत कांहीं त्या दुसऱ्या इसमास डायनाबद्दल तशी कोणतीच खात्री देतां आली नसती.

एकूण सांगण्याचें तात्पर्य एवढेंच कीं आमच्या कावेरीच्या उद्‌गारांनीं मला उगीच चार–दोन दिवस जास्त मानसिक त्रास दिला. पुढें तो कमी झाला, व आतां त्या गोष्टीसदेखील पांच सहा महिने झाल्यामुळें व त्यावर दोन तीन वेळां उभ्या उभ्याच डायनाशीं भेटण्याचा व बोलण्याचा देखील प्रसंग आल्यामुळें त्या उद्‌गारांची एक मजाच वाटूं लागली आहे. खुद्द डायनाच्या कानांवरदेखील मी ही हकीगत एका प्रसंगीं मुद्दाम घातली आणि तिचा त्यावर काय अभिप्राय पडतो हेंच पाहण्याचा माझा उद्देश होता! पण तें ऐकल्यावर आम्ही दोघेंहीजण बिचाऱ्या कावेरीच्या कल्पनातरंगाची तारीफच करीत राहिलों ! !

# विक्षिप्त कीं विचारी ?

माझा मित्र रघुनाथ आज सकाळीं मजकडे सुमारें ९।९॥ वाजतां आला. त्यावेळीं मी नुकताच दाढी करावयास बसलों होतों. रँग्लर परांजप्यांप्रमाणेंच मी साधा रेझर वापरीत असें,* अलीकडील सेफ्टी रेझर मला आवडत नसे. माझें काम निम्मे अधिक झालेलें असल्यामुळें मी त्यास 'बस' म्हटलें, व आपलें काम तसेंच सुरू ठेवलें.

रघुनाथनें डोक्यावरील टोपी टेबलावर आपटली व नंतर तो एखाद्या सर्कसच्या पिंजऱ्यांत ठेवलेल्या वाघाप्रमाणें खोलीच्या ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत येरझारा घालूं लागला. येरझारा घालीत असतांना तो मध्येंच थांबे, खुर्चीवर बसे, पुन: कांहीं वेळानें उठे व

---

* १९३२ च्या मे महिन्यांत पुण्याच्या श्री शिवाजी मंदिरांत रा. नरसोपंत केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं स्वदेशीप्रचार संघाच्या मार्फत भरलेल्या जाहीर सभेंत रँ. परांजपे यांनीं स्वत:च ही गोष्ट सांगितली होती, म्हणून यांस कोणी माझी कपोलकल्पित गप्प समजूं नये.

पुन: येरझारा घाली. त्याचा चेहरा तारवटलेला, डोळे जागरणामुळें जसे त्रासिक दिसतात तसे त्रासिक; व डोक्यावरील केस अस्ताव्यस्त दिसत होते. मला वाटतें तो सकाळीं उठल्यानंतर आपलें नित्यकर्म कसें तरी आटोपून नंतर मजकडे आला असावा.

माझें नापितकर्म आटोपल्यावर मी आपलीं हत्यारें स्वच्छ धुवून-पुसून ठेवलीं व नंतर रघुनाथाकडे वळून म्हटलें—“ आज एवढा उदास कां रे दिसतोस? अजून पूर्व रामचरित्र होण्यापूर्वी उत्तर रामचरित्रच कां दाखवतोस आम्हांला?” थोडा वेळ थांबून व माझ्या विनोदाचा त्याजवर कांहीं परिणाम झाला कीं नाहीं तें पाहून मी पुन: म्हणालों “ मुहूर्त केव्हांचा ठरला रघू ?”

‘ मुहूर्त ठरला आहे पंचमीचा-आजपासून पंधरा दिवसांनीं पण....’

“ पण काय अन् परंतु काय ?”

या वेळीं त्याचा उजवा हात त्याचे कोटाच्या खिशांत कांहीं तरी चांचपीत असावा. त्या वेळीं तो टेबलास टेंकून उभा होता व डाव्या हातानें डोक्यावरच्या केंसांशीं त्याचा चाळा चालला होता. एका-एकीं तो पुन: उठला व त्याच्या येरझारा सुरू झाल्या. मध्येंच थांबून तो म्हणाला—“ विनू आधीं चहा टाक स्टोवर. मग थोडी स्वस्थता आल्यावर आपण पुष्कळच बोलूं.”

त्याच्या नेहमींच्या आनंदी व बडबडया वृत्तीमध्यें आज हा असा एकाएकीं विलक्षण फरक दिसल्यामुळें मी तर चकितच होऊन गेलों होतों. म्हणूनच मी प्रथम त्याचेजवळ गेलों व त्याचा हात धरून पाहिला. त्याची नाडी संथच होती, अंग नेहमींप्रमाणें होतें........

“ चहा टाकतोस कीं नाहीं विन्या” असें थोडयाशा त्रासिक स्वरानें तो ओरडला. मीदेखील इतर कांहीं एक हालचाल न करतां

एकाद्या इमानी कुत्र्याप्रमाणें कोपऱ्यांतल्या टेबलाजवळ जाऊन स्टोव्ह पेटवला व चहाची सिद्धता केली. पण चहा करीत असतांना मी त्याच्या हालचालींकडे त्याच्या नकळतपणानें पण बारकाईची नजर ठेवली होती. तो टेबलासमोरच्या खुर्चीवर बसला होता व त्यानें टेबलावर दोन लिफाफे ठेविले होते. पुन: पुन: तो त्यांजकडे पाही, त्यांतील कागद बाहेर काढलेसे करी, व पुन: आंत ठेवून देई. एकदां तर त्यानें ते लिफाफे तसेच पुन: खिशांत कोंबले. एवढया वेळांत माझा चहा तयार झाला होता. मी एक कप हॉटेलमधील वेटरप्रमाणें त्याचेपुढें जाऊन मोठया आदबीनें खालीं वाकून "साहेब" म्हणून त्याच्या टेबलावर ठेवला व माझा कप मी हातांत घेऊन चहाचे घोट घेऊं लागलों.

चहाचा एक घुटका घेतल्यावर रघुनाथ म्हणाला "विनू आत्तांचा हा क्षण माझ्या आयुष्यांतील अत्यंत महत्त्वाचा आहे. काल संध्याकाळीं माझें लग्न ठरल्याचें म्हणजे मुहूर्त व हुंडापांडा ठरल्याचें ऐकल्यापासून माझें डोकें सुन्न होऊन गेलें आहे........रात्रभर डोळ्यास डोळा लागला नाहीं. तुझ्याकडे विशेष काम आहे म्हणून उठल्यावर कसे बसे नित्य व्यवहार आटोपून लगेच आलों. 'स्निग्ध जन संविभक्तं हि दु:खं सह्य वेदनं भवति' ही कालिदासोक्ति तुला माहीत असेलच........'

"हो हो. अगदीं चांगली माहीत आहे. म्हणून उघड आपलें हृदय–कपाट. मी तुला मदत करावयास सदैव तयारच आहें."

"मदतीबिदतीची यत्किंचित्हि जरूरी नाहीं. मी जें पाऊल टाकूं इच्छितों तें टाकूं कीं नको याच बाबतींत मला अगदीं अंत:करणापासून असा तुझा सल्ला पाहिजे आहे.... हीं दोन पत्रें वाच म्हणजे सर्व कांहीं तुला समजेल."

पहिलें पत्र मी उघडून वाचलें, तें समग्रच येथें देणें योग्य वाटतें.*

सा. न. वि. वि.

काल संध्याकाळीं मला माझा व आपली कन्या चि. शकुंतला इचा विवाह ठरल्याचें कळलें. हुंडा रुपये अडीच हजार हेंही अर्थात् कळलेंच. पण ह्या बातम्या ऐकून माझ्या मनांत विलक्षण खळबळ उडाली. श्रीसमर्थ रामदासस्वामी यांना लग्नांत " सावधान" हे शब्द ऐकून 'सावधानता' प्राप्त झाली. पण मला काल रात्रीं लग्न ठरल्याचें ऐकूनच एका निराळ्या प्रकारची सावधानता प्राप्त झाली आहे!

आपल्या मुलीचें व माझें लग्न झाल्यास माझ्या मतानें तिला प्रथम कांहीं दिवस तरी सुख लाभणार नाहीं. म्हणून शक्य तर आपण आपल्या मुलीच्या कल्याणास्तव हें लग्न मोडावें असें मी आपणांस या पत्रानें सुचवीत आहें.

या पत्राच्या विचित्रपणामुळें आपण आश्चर्यचकित होण्याचें कारण नाहीं. मी माझ्या स्वतःच्या भावी पत्नीविषयीं पुष्कळच विचार केलेला आहे. तसेंच मला माझ्या घरच्या एकंदर परिस्थितीविषयीं पूर्ण माहिती असणें यांत नवल नाहीं; पण आपणांस ती पूर्णपणें माहीत नाहीं असें दिसतें. त्याचप्रमाणें आपल्या कन्येच्या मनस्थितिविषयीं मला जितकी अटकळ करतां आली तितकी आपणांस आली नसावी असाही माझा समज आहे.

आडपडदा सोडून व स्पष्ट सांगायचें म्हणजे आम्ही श्रीमंत व आपल्या तोलाचे असलों तरी आम्ही एकप्रकारें गरीबच

* रघुनाथनें मला ह्या दोन्ही पत्राच्या नकला मागाहून दिल्या म्हणून मी तीं पत्रें येथें देऊं शकतों.

आहोंत ! याला कारण आमच्या अण्णांचा चिक्कूपणा. आपली स्थिति आमच्या अगदीं उलट आहे. आम्ही संपत्ति घरांत उबवून ठेवतों, तर तुम्ही तिचा योग्य उपभोग घेतां. ही गोष्ट माझ्या सूक्ष्म नजरेंत मी जेव्हां आपली मुलगी पहावयास आपल्या घरीं आलों होतों त्या वेळेसच आली. पण त्यावेळीं मला लग्नासंबंधीं खोल विचार करण्याची एवढी जरुरी वाटली नाहीं. आतां मी या लग्नसंबंधाकडे आपल्या मुलीच्या दृष्टीनें पाहूं लागलों. तिचें आजपर्यंतचें आयुष्य सुखांत व ऐषआरामांत गेलें आहे. एखाद्या फुलपांखराप्रमाणें तिनें आजपर्यंतचे दिवस घालविले असतील. पण आमच्याकडे आल्यानंतर तिला लवकरच घरांतील कामाचा रगाडा यथाशक्ति उपसावा लागेल ! एखाद्या सामान्य गर्भश्रीमंतास चारुदत्ताप्रमाणें एकाएकीं दारिद्र्य आल्यास किंवा सुखपर्वतावरून दुःखरूप खोल दरींत पडल्यास मनाची शांति किंवा समाधान राखतां येणार नाहीं. आपल्या कन्येची स्थिति निदान आमच्या अण्णांच्या हयातीपर्यंत तरी अशी बिकट होईल.

या लहान वयांत असल्या स्थितीचा तिच्या मनावर काय परिणाम होईल बरें ? मला वाटतें, तुम्ही आमच्या तिजोरींतल्या किंवा बँकेमधल्या इस्टेटीकडे नजर दिलीत, पण तो पैसा आज तरी आमच्या तिजोरींत नसल्याप्रमाणेंच आहे. सबब आपण आपल्या मुलीच्या सुखाच्या दृष्टीनें हा संबंध मोडून टाकावा अशी मी आपणांस विनंति करतों.

अशाच अर्थाचें एक पत्र मी माझ्या वडिलांस लिहीत आहें. कळावें. लो. अ. ही विनंति.

आपला

रघुनाथ....

दुसरें पत्र खालीं दिलें आहे.

कृ. शि. सा. न. विज्ञापना विशेष.

आजपर्यंत मी जरी आपल्या अगदीं अर्ध्या वचनांत राहणारा आज्ञाधारक असा पुत्र नव्हतों, तरी आपली जाणून बुजून मी कधीं अवज्ञा केलेली आहे असें मला आठवत नाहीं. साधारणत: मी आजपर्यंत आपल्या इच्छेनुसार वागत आलों आहें व पुढेंहि वागेन.... पण एवढी प्रस्तावना करण्याचें कारण म्हणजे आज मात्र असा एक प्रश्न उभा राहिला आहे कीं मला आपली आज्ञा मोडणें प्राप्त झालें आहे.....काल रात्रीपर्यंत मला या प्रसंगाची कल्पनाही नव्हती, पण एकाएकीं मी जागा होऊन एका मुलीच्या भावी आयुष्यांतील हिताच्या दृष्टीनें ही गोष्ट करणें मला भाग पडत आहे.

बाळासाहेबांच्या शकुंतलेशीं आपण माझा विवाह काल ठरवून आलांत....पण मला आतां हा विवाहसंबंध आपण मोडून टाकावा असें वाटत आहे व हें माझें म्हणणें कांहीं अविचारीपणाचें नाहीं. आपणांस व बाळासाहेबांसदेखील हें करणें दोन्ही घराण्यांच्या इभ्रतीस्तव जड जाईल. पण त्यास दुसरा इलाज नाहीं....बाळासाहेबांच्या ऐश्वर्य उपभोगलेल्या मुलीस आपल्या सारख्यांच्या घरांत सुख लागणें अगदीं अशक्य आहे. बाळासाहेबांपेक्षांहो आपण जास्त श्रीमंत आहोंत; पण आपण आपली श्रीमंती तिजोरींत पुरून ठेवतों व सामान्य लोकांप्रमाणें ( किंवा गरीबांप्रमाणेंच ) राहतों. आपल्या राहणीप्रमाणें वागतांना त्यांच्या मुलीच्या शरीरास व मनास किती यातना होतील याची कल्पना तुम्हांस अगर प्रत्यक्ष मुलीच्या वडिलांस—बाळासाहेबांस—नसली तरी मला कल्पनेनें तें सारें समजूं शकलें.

म्हणून मी स्वतःच तिच्याशीं लग्न लावूं इच्छित नाहीं. आपण हें लग्न शक्य तितक्या लवकर मोडून टाकावें.

कदाचित आपणांस हें करणें आवडणार नाहीं असें वाटल्यावरून मी श्री. बाळासाहेब यांस देखील "हें लग्न आपण कृपा करून मोडून टाका व आपल्या मुलीला कांहीं काळपर्यंत तरी दुःखांत लोटूं नका" अशा अर्थाचें एक पत्र पाठवून हें लग्न मोडण्याची विनंति केली आहे. तेव्हां आपण दोघेहीजण एकदां समक्ष भेटून हा विवाह कृपा करून मोडून टाका अशी माझी आपणास हात जोडून विनंति आहे.

बालकावर राग करूं नये. सेवेशीं श्रुत होत ही विज्ञापना.

आपला,

रघुनाथ.

*　　*　　*

लघुकथेच्या तंत्राच्या दृष्टीनें पाहणाऱ्या चिकित्सक वाचकांनीं पुढें कांहीं वाचूं नये, नाहीं तर त्यांस लेखकाचा राग येईल. इतरांकरितां "हें लग्न मोडलें" एवढेंच जास्त सांगतों.

—रचनाकाळ: मार्च १९३३

## ‘ अस्पृश्य गोखले ’

कदाचित् कोणाला वाटेल, मी प्रो. श्री. म. माटे यांचा निस्सीम भक्त आहे,व त्यांचें अंधानुकरण करून “अस्पृश्य गोखले”या नांवानें स्वत:ला विभूपवीत आहें! पण हा किताब मला शिवीप्रमाणें वाटत आहे. ज्या एका दिवशीं मला स्वत:ला माझ्या अस्पृश्यतेची तीव्र जाणीव झाली त्या दिवशींची हकीगत मी खालीं देत आहें, व त्यावरून मी प्रो. माटयांचा भक्त नाहीं हेंही जातां जातां वाचकांच्या नजरेस येईलच. पोस्टमननें “ व्ही. जी. गोखले ” असें ओरडून एक पत्र माझ्या लेटर बॉक्समध्यें टाकलें. त्याची असें ओरडण्याची व नंतर पत्र टाकण्याची एक लकब होती, व म्हणून मी तो ओरडून गेल्यावर थोडा घाईघाईनें व उत्सुकतेनें पत्र कोणाचें आहे म्हणून पाहण्यास गेलों. गडकऱ्यांच्या भावबंधनांत कामण्णानें वर्णन केलेल्या पांच विरहावस्थांपैकीं एका प्रकारची विरहावस्था मी सध्यां उपभोगीत असल्यामुळें मी पाकीटावरील पत्त्याचें हस्ताक्षर प्रथम वाचून पहात असें. व चिरपरिचित थोडेसें घाणेरडेंच पण मला सुखविणारें अक्षर

तें आहे कीं काय म्हणून पाहण्याचा माझा परिपाठ असे. पण त्यानंतर अगदीं सुधारकी तरुणांप्रमाणें मी पाकीटाचें चुंबन मात्र कधींच घेत नसे!....त्या दिवशीं माझ्या नांवानें एक साधेंसुधें पोस्ट कार्डच होतें, म्हणून माझी उत्कंठा निम्यानें कमी झाली! मी खोलींत गेलों व खुर्चीवर बसून कार्ड वाचून पाहूं लागलों. तें कार्ड समग्रच देतों.

शनिवार पेठ, पुणें २.

सा. न. वि. वि. ता. × × जून, ३४

उभ्या जन्मांत तुमचें व माझें कधींच बोलणें चालणें झालेलें नव्हतें. मी तुम्हांस मिस्टर गोखले म्हणून व तुम्ही मला मिस्टर लिमये म्हणून ओळखीत होतों, एवढेंच. आणि याचें कारण ५।६ वर्षांपूर्वीं आपण एका आळींत राहात होतों. तुम्ही माझ्यापेक्षां वयानें व शिक्षणानेंही पुष्कळच मोठे आहांत असें असतांना काल संध्याकाळीं एकाएकीं आपली सहज रस्त्यांत गांठ पडली असतांना जरा तिरकी मान करून आपण मला "कॉन्ग्रॅट्स्" म्हटलेंत् त्याचा मला अर्थच समजेना. वास्तविक तुमच्याकडून मी मॅट्रिक पास झाल्याबद्दल अभिनंदनपर उद्गारांची अपेक्षाच केली नव्हती म्हणून तुम्ही तसे उद्गार काढल्याबद्दल मला बरें वाटलें नाहीं! यास्तव तुम्ही मला कदाचित् विक्षिप्त देखील म्हणाल, पण त्याबद्दल मला पर्वा वाटत नाहीं. आपली व माझी दाट ओळख होऊं नये असेंच मला वाटत आहे. कां तें सांगतां येत नाहीं. तरी तुम्ही पुन: माझ्याशीं अशा प्रकारें बोलण्या चालण्याचा यत्न करूं नये. कळावें लोभ करावा ही विनंति.

आपला

द. ग. लिमये.

असलें हें तऱ्हेवाईक, विक्षप्तपणाचें एकाद्या मित्र्या कॉलेजांतल्या पोरीला शोभणारें व अपमानकारक पत्र वाचून माझें डोकें फिरूं लागलें ! आनंदातिरेकानें Gold Rush या चित्रपटांत चार्लीचॅप्लिननें एक उशी फाडून त्यांतील रुईचा कापूस नासून सर्व खोलीभर उडवून दिलान्, त्याची मला आठवण झाली ; व आपणही कांहींतरी असेंच एखादें कृत्य करून आपला संताप व्यक्त करावा अशी मला कल्पना सुचली....पण मी तो मीच व चॅप्लिन तो चॅप्लिनच ! मी कांहीं केलें नाहीं ; नुसता खुर्चीवर बसून राहिलों व थोडया वेळानें आंथरुणावर पडून वरच्या पटईकडे डोळे ताणून पाहूं लागलों.....!!

तीन चार दिवसांपूर्वींच मॅट्रिकच्या निकालांत मी मिस्टर लिमयेचें नांव वाचलें होतें, व तो रस्त्यांत मला दिसल्यावर एकाएकीं मनांत इच्छा उत्पन्न होऊन मी सहजगत्या "कॉन्ग्रॅट्स्" असें म्हणून पुढें चालूं लागलों होतों. या एवढयाशा गोष्टीचें पुढें एवढें मोठें "रामायण" होईल अशी माझी कल्पनाही नव्हती. पण अशा अर्थाचें एक इंग्रजी वाक्यच आहे ना! "Life is stranger than fiction" त्या वाक्याचा मला चांगलाच अनुभव आला.

मिस्टर लिमयांच्या पत्रांतील शेवटचीं वाक्यें मला फारच लागून राहिलीं. मी थोडासा व्यसनी(?)होतों....निदान मला लोक तसें समजत असत. कारण मी चहाभक्त होतों, अग्निहोत्र देखील मी घेतलेलें होतें, व तपकीर ही मी शाळेंत असतांनाच मला जळूप्रमाणें चिकटली होती. मी वर्णानें काळा सांवळा ठेंगणा व लठ्ठ होतों. त्यामुळें मी कुरूपांत मोडत असे. वरेरकर मामांच्या डॉ. पशूप्रमाणें मी पुष्क-

ळशीं वर्षें शाळा-कॉलेजांत घालविलीं, व त्यामुळें ललितकलांचा निस्सीम भक्त बनलों. नाटकें—सिनेमा दर आठवड्यास माझीं चुकत नसत.... पण हल्लीं आयुष्याची झळ लागल्यामुळें माझें तें कॉलेजांतील फुलपांखरी आयुष्य संपुष्टांत आलें होतें. हल्लीं मी एक बेकार "एच. पी." आहे, व वेळ दवडण्याचें साधन म्हणून वाङ्मय-सेवा आरंभिली आहे. क्वचित् क्वचित् माझें लिखाण बहुजन समाजापुढें येऊं लागलें आहे. पण त्यापासून मला अर्थप्राप्ती यत्किंचित देखील नाहीं. उलट अर्थहानि मात्र आहे. लबाड धंदेवाईक प्रकाशकांस 'तात्यासाहेब,' 'नानासाहेब' वगैरे किताबांनीं भूषवून घरीं सन्मानानें बोलावून चहा-सिगारेटांचा पुरवठा केला तरच आम्हांला 'प्रसिद्धी' मिळावयाची; नाहीं तर आम्हांस पुसतो कोण!

महात्मा गांधीनीं अलीकडे म्हणे अस्पृश्योद्धाराची चळवळ सुरू केली आहे व त्यांस स्पृश्य करून समाजांत मानमरातब मिळावा म्हणून चंग बांधला आहे. पण मला स्वत:ला मात्र माझ्या भोंवतालच्या समाजाकडून अस्पृश्य ठरविण्यांत येऊं लागलें आहे. याचें कारण मला वाटतें माझी थोडीशी व्यसनाधीनता, बेकारी, कुरूपपणा, व सगळ्यांत मोठें म्हणजे दारिद्र्य....पण मला वाटतें मी जर एकादा लक्षाधीश असतों व मोटारींतून हिंडलों असतों, तर एव्हांना एखादा "दे. भ., एम.एल. ए.," म्युनिसिपालिटीचा अध्यक्ष, किंवा निदान मेंबर तरी झालोंच असतों! व मग हा लिमया माझ्या दारांत 'भाऊसाहेब,' 'दादासाहेब' करीत लाळ घोटीत आला असता! मग माझी व्यसनाधीनता, कुरूपपणा वगैरे गोष्टींवर बोळा फांसला जाऊन मी सन्मान्य गृहस्थ झालों असतों....संस्कृत कवीनें म्हटल्याप्रमाणें जग हें अर्थाचें दास आहे.

“ यस्यास्ति वित्तं स नरः कुलीनः ।
स पंडितः स श्रुतिमान्गुणज्ञः ।
स एव वक्ता स च दर्शनीयः
सर्वे गुणाः कांचनमाश्रयन्ते ॥

—रचनाकाळ, ता. १६।४।१९३५, वेळ सकाळीं १० ते ११

# एक नूर आदमी, तो दस नूर कपडा!

ऑपेरा हाऊसकडे जाणाऱ्या ट्रॅममध्यें मी फ्लोराफाऊंटन जवळच बसलों. ती वेळ अगदीं संध्याकाळची ७॥–८ वाजण्याची होती. ट्रॅम नुसती फुलली होती. धोबी तलावाजवळ जीं कांहीं माणसें आंत घुसलीं त्यांत एक जोडपें होतें, व जागा शोधीत शोधीत तें थेट वरच्या मजल्यावर येऊन माझ्या समोरच्या बांकावर बसलें. तो गृहस्थ माझा कॉलेजांतील स्नेही असल्यानें व आम्ही अनेक वर्षांनीं एकमेकांस भेटत असल्यानें मी त्यास ओळख दिली. "कसें काय गुलाबराव, बरें चाललें आहे ना ?"

माझ्याकडे पाठ वळवून पाहून व जरा वेळ आठवल्यासारखें करून "ओऽहोऽहो ! आपण विसूभाऊ ओकच नाहीं ?"

"होय, मी विसूभाऊच. आपण सध्यां काय करीत असतां, आपलें कसें काय चाललें आहे ?"

"काय सांगावें विसुभाऊ, दिवस फार कठीण आहेत, हें काय तुम्हांला दिसत नाहीं. असतों फोर्टमध्यें × × या सॉलिसिटरांच्या

फर्ममध्यें. पण तुम्ही काय करीत असतां ? " गुलाबराव म्हणाला.

मी हल्लीं उमरावतीस मास्तर आहें, पण उन्हाळ्याच्या सुट्टींत पुण्यास आलों होतों. चार दिवस गम्मत करावयास आलों झालें मुंबईस. "

" असं का ! बाकी तें मी ओळखलेंच, तुम्हाला पाहिल्या-बरोबर...."

" तें कसें काय बुवा ! माझ्या कपाळावर कांहीं मी "मास्तर" आहे, म्हणून पाटी लाविली नाहीं. किंवा पुण्यांत झुळमुळ्यांची पगडी धारण करणारा गृहस्थ म्हणजे वकील हें जसें बिनचूकपणें ओळखतां येतें, तसा कांहीं प्रकार आजकाल तुमच्या मुंबईंत शिरला आहे कीं काय ? "

" मी तुम्हांस मास्तर म्हणून ओळखलें नाहीं; पण वऱ्हाडी म्हणून ओळखलें ! "

मी पुनः आश्चर्यचकित झालों—" कांहीं ज्योतिषबितिष किंवा असलीच विद्या पैदा केली आहे काय आपण ! नुसतें पाहूनच मी वऱ्हाडी आहे हें आपण ओळखलंत तरी कसें ? कारण आपलें हें बोलणें मला तरी 'स्वयंवरां'तल्या धनेश्वर दीक्षिताप्रमाणें—'पाहा-यचं आणि सांगायचं' किंवा थोडा फरक करून 'ऐकायचं आणि सांगायचं' अशांतलेंच वाटत आहे ! नव्हे का ? "

गुलाब थोडासा थिजलाच. विशेषतः त्याच्या बायकोसमोर मी जरा जास्त धीटपणानें त्याला टोला लगावला, म्हणून त्याला फार राग आला असावा. तरी स्वसमर्थनार्थ तो म्हणाला—" अगदींच कांहीं तसें नव्हे; स्वतःकडे थोडया तिऱ्हाइताच्या नजरेनें पहा, म्हणजे विसुभाऊ तुमच्या लक्षांत माझा भावार्थ येईल. "

खेळाडूपणाच्या वृत्तीमुळें मी तो टोला आनंदानें स्वीकारला एवढेंच नव्हे तर तो माझ्या लक्षांत नीटपणानें आला असें दाखविण्याकरितां मी म्हणालों—'बरोबर आहे, गुलाब,' शाबासकी प्रदर्शित करण्यासाठीं मी त्याचे हातावर टाळी दिली. "माझ्या रेशीमकांठीं धोतर नेसण्यावरून व दाढी मिशा दररोज न काढण्याच्या पद्धतीवरून, तसेंच टोपी न घालण्याच्या पद्धतीवरून तूं मला वऱ्हाडी तरुण समजलास यांत तुझी शोधक नजर व चतुराईच स्पष्ट होत आहे." गुलाबच्या पत्नीची कळी जरा उमलली!....पण तेवढयांत ट्रॅम टर्मिनसजवळ येत चालल्यामुळें तो मला म्हणाला 'तूं उतरला आहेस कोठें ? एकदां आमच्याकडे चहाला जरूर ये बरं का.' आपल्या पत्नीला उद्देशून नंतर तो म्हणाला—"हे विसुभाऊ माझे कॉलेजमधील बडे दोस्त आहेत, बरं" असें म्हणून ते दोघेजण जिना उतरण्याची तयारी करूं लागले.

"मी माधवाश्रमांत उतरलों आहे; एक दोन दिवसांत येईन हं तुमच्या घरीं" असें माझें म्हणणें ऐकल्यावर तीं दोघेजण उतरून आपल्या वाटेनें निघून गेलीं.

गुलाब पाठारेनें आपल्या पत्नीस आम्ही "बडे दोस्त" होतों म्हणून सांगितलें होतें तरीदेखील वस्तुस्थिति तशी नव्हती. त्याची व माझी ओळख होती, रहस्य नव्हतें. बहुधा प्रभु किंवा पाठारे लोक आपल्या ब्राह्मणमंडळींचे दोस्त बनूंच शकत नाहींत. कारण तो समाज ब्राह्मण समाजास मनांतून स्वतःपेक्षां उच्च समजत असल्यामुळें व स्वतःच्या समाजास त्या उच्च पदवीप्रत पोंचविण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा असल्यानें आपल्या लोकांशीं स्पर्धा करीत असतात. ब्राह्मणाब्राह्मणांत देखील कोंकणस्थांशीं देशस्थ व कऱ्हाडे ब्राह्मण

स्पर्धा करीत नाहींत काय ? तशांतलाच तो एक प्रकार आहे; व त्यांत फारसें वावगेंही नाहीं. समाजाची उन्नति होण्यास समाजांत श्रेष्ठ कनिष्ठ थर असावेत व समाजाच्या निरनिराळया अंगोपांगांमध्यें स्पर्धा ही अवश्य हवीच.

गुलाबच्या पहिल्या भाषणानें म्हणजे मी वऱ्हाडी मास्तर आहें हें ओळखल्याबद्दल मला दर्शविणाऱ्या पहिल्या वाक्यानें मला खरोखर त्याचा थोडासा राग आला होता; पण पुढें मीं संभाषणाच्या ओघाला निराळीच दिशा दाखवून त्यांतून थोडासा विनोद निर्माण करण्याचा प्रयत्न केला. त्याचा स्वतःचा पोषाख मात्र अगदीं हॅटपासून पूर्ण साहेबी होता. पण त्याची बायको मात्र बहुतेक देशी साहेबांच्या बायकांप्रमाणें मड्डम बनली नव्हती. तिनें मुंबईकर पाठारे प्रभु समाजांतील स्त्रियांप्रमाणेंच वेषभूषा केली होती. मला तिच्या आंबाड्यावरची साइलीची वेणी, नाकांतली चमकी व चांगलीशी शालजोडीच फक्त आठवते. त्याचें मला चहाचें बोलावणें जसें औपचारिक, तसें माझें निमंत्रण स्वीकारणेंदेखील औपचारिकच !

*　　　　*　　　　*　　　　*

दुसऱ्याच दिवशींची गोष्ट. मी दुपारच्या वेळीं असाच कांहीं कामाकरितां बाहेर पडलों होतों. तों वाटेंतच मला एका पूर्ण सूट केलेल्या गांवठी साहेबांनीं थांबवलें व म्हटलें “ ओळखलंत कां दादासाहेब, गरिबाला. ”

मी अगदींच बुचकळ्यांत पडलों. “ वरून तर हा चांगला शिष्ट संभावित, व कोणी बडा इसम असावेंसें दिसत आहे, पण दिसत आहे आपल्या गेनू न्हाव्याप्रमाणें ! काय प्रकार आहे कोण जाणें ” असा मनाशीं विचार करीतच मी उभा राहिलों. तेव्हां तोच पुन:

म्हणाला—" दादासाहेब मी आपला गेनू ; आपले केस कापावयास घरीं येत नसे का पुन्यास धा बारा वर्सांपूर्वी. "

" बरोबर ! मी तुला चेहऱ्यावरून तर ओळखलं होतं पण आपलं मनांत म्हटलं गेनू असा साहेब बनला केव्हां ? "

" जिवाची ममई करतों साहेब थोडीशी, आन् दुसरं काय ! पुन्याहून चारपांच वर्साआंदीं इथं आलों अन् एका सलूनमधीं धरली नौकरी. नसीब चांगलं म्हून पैका सांठला थोडा. वर्सा आधींच आतां स्वोताचं दुकान काढलया बघा, प्रार्थना समाजाजवळ. या कोण्या वेळीं एखान्दा गरिबाची सेवा घ्यायला... यम्पायर हेअर कटिंग सलून, बरं का दादा; प्रार्थना समाजाजवळ. " मी देखील एखाद्या वेळीं येईन केव्हांतरी म्हणून त्यास सांगितलें.

* * * *

लागोपाठ दोन दिवशीं दोन निरनिराळे अनुभव आले. पूर्वाश्रमींचीं दोन माणसें भिन्नभिन्न परिस्थितींत असलेलीं भेटलीं, व प्रत्येकाची वर्तणूक जरा विशेषच प्रकारची आढळली. गुलाब पाठारे थोडा चढेलपणानें वागला, तर गेनू नखशिखांत साहेब बनून वरवर पूर्णपणें बदलेला दिसत असला तरी अदबीनें वागत होता. या मुंबईत पोषाखीपणा मात्र फारच वाढलेला मला दिसला. परगांवीं साधारणतः पोषाखावरून माणसाचा दर्जा वगैरे ओळखण्यास फारशी पंचाइत पडत नाहीं, पण मुंबईंत मात्र " एक नूर आदमी व दस नूर कपडा " ही म्हण पदोपदीं सार्थ होत असतांना दिसते. इंग्रजी पेहेरावानें मुंबईकरांवर इतकी छाप पाडली आहे कीं परगांवचे लोक त्यांस रानटीच वाटतात !

—रचनाकाळ १९।४।१९३५, दुपारीं ४। ते ५।।

# " इंटर-व्ह्यू "

" या बसा ! " हस्तिदंती करीत एक मध्यम वयाचे टक्कल-धारी सद्गृहस्थ म्हणाले. हेच बहुधा नानासाहेब असावेत.

" हे आपले नवे हेडमास्तर, बरं का नाना. " असें बगाराम त्या मध्यम वयस्क गृहस्थांस म्हणाला. " हेच आमच्या संस्थेच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष. " हें जणू काय मला समजावून द्यावें या नात्यानें बगारामानें मला सांगितलें.

अध्यक्ष मजकडे वळून म्हणाले " केव्हां आलांत तुम्ही, पुण्याहून?"

" आत्तांच एक तासापूर्वीं आलों. "

" बापूऽऽ हे पहा आपले हेडमास्तर " असें जरा मोठयानें ओरडून अध्यक्ष महाराज बाजूला चारपांच इसम सोंगटया खेळत बसले होते त्यांजकडे वळून म्हणाले.

त्याबरोबर ती मंडळी आमचेकडे वळली. नंतर एका गडयास हांक मारून नानासाहेबांनीं (अध्यक्षांनीं) भाऊसाहेब, दादासाहेब, वगैरे तीन चार साहेबांस त्यांच्या घरून बोलावून आणण्यास सांगि-

तलें. नंतर माझ्याकडे वळून नानासाहेब म्हणाले—“ तुम्ही बी. टी. कोणच्या सालीं झालांत ? ”

“ यंदाच झालों. ”

“ तुमचे विषय कोणते होते, बी. टी. ला ? ”

“ मुख्य विषय इंग्रजी, नंतर दुसरा संस्कृत, व तिसरा भूगोल हे माझे विषय आहेत. ”

“ विनायकराव, आपलें तें अर्जांचें फाईल काढा बरें एकदां. ”

पलीकडच्या कोपऱ्यांत बसलेले एक कारकून एका फडताळांतून एक फाईल घेऊन आले. नानासाहेबांनीं तें उघडून त्यांतून माझा अर्ज काढून त्यांनीं तो पुन्हां एकदां वाचला.

नंतर थोडा विचार करून ते मजकडे वळून म्हणाले “ आमचें स्केल ६०–५–१२५ पर्यंत आहे. पण तुम्हांस आम्ही हेडमास्तर म्हणून नेमणार असल्यामुळें सुरुवातीस ७० देण्याचें ठरवलें आहे. कायम केल्यानंतर आम्ही २००० ची लाइफ पॉलिसी देखील उतरून देत असतों.....”

इतक्यांत एक गृहस्थ नानांना म्हणाले “ काय हो....आपणांकडे एका टी. डी. चाही अर्ज आला आहे ना ? ते काय म्हणतात ? ”

“ अहो टी. डी. चाच काय, पुष्कळ....शंभर....अर्ज पडले आहेत फाइलांत. पण करायचे आहेत काय ? टी. डी. मागतात १५० रुपये दरमहा, आहेत का तुमच्याजवळ द्यायला ? ”

“ मग हे काय मागत आहेत आपल्या अर्जांत ? ”

“ ह्यांनीं ८० रुपये मागितले आहेत. शिवाय ह्यांचीं सर्टि-फिकिटें चांगलीं आहेत.”

तिसरे एकजण म्हणाले....“ आणखी किती बी. टीं. चे अर्ज आले आहेत ? ”

“ आणखी ५ अर्ज आले आहेत. बी. टी. वाल्यांचे. त्या सर्वांत आम्हांस हेच पसंत असल्यानें यांस आम्ही प्रथम बोलावले. ”

एक म्हातारेसे गृहस्थ ( सोंगटयांच्या अड्डयांतील ) म्हणाले—“ नाना, आपले काळे मास्तर आज इतकीं वर्षे शाळा उत्तम चालवीत असतांना व दरसाल आपला मॅट्रिकचा निकालही चांगला लागत असतांना दुसरे हेडमास्तर हवेत कशाला ? ”

“ यंदा जर तुम्ही बी. टी. हेडमास्तर नेमला नाहींत, तर तुमची शाळा बंद पडेल, समजलांत. आम्हांला काय हें समजत नाहीं वाटतं अण्णा ? पण ते इन्स्पेक्टर आणि युनिव्हर्सिटी कमिशन आहे ना आडवें पडलेलें ! त्यांनीं दर खेपेस ‘ ह्या संस्थेंत बी. टी. नाहींत, म्हणून शेरे ओढले आहेत शेरे ! यंदापर्यंत आम्ही कसें तरी भागवलें आहे....पण ऽ ऽ यंदा एक तरी बी. टी. नेमणें अवश्य आहे....” एवढें व्याख्यान झोडल्यावर थोडा दम टाकून नाना मला म्हणाले—“ तुम्ही यापूर्वीं कोठें हेडमास्तरचें काम केलें होतें का ? ”

“ नाहीं, मला तशी संधिच मिळाली नाहीं ”

“ हे बी. टी. म्हणजे का विशेष चांगले शिक्षक असतात काय?” एक गृहस्थ म्हणाले.

“ कसलं आलं आहे हो ! एक थोतांड आहे झालं.....मला आठवतंय् चांगलं. मी जेव्हां मुंबईस एल्फिन्स्टन हायस्कुलांत शिकत होतों लहान असतांना, तेव्हां आम्हाला बी. टी. होणारे शिक्षक येत असत शिकवायला. जम्प शब्द शिकवावयाचा असला तर हे उडी मारून दाखवतील एकादी दुसरें काय ? ” या वेळीं खूपच हंशा

पिकला. ही हास्याची लकेर ओसरल्यावर पुन: हेच गृहस्थ म्हणाले—
“ कांहीं तरी माकड चेष्टा करून व हातवारे करून शिकवलं म्हणजे झालं बी. टी. वाल्यांचं शिकवणं—— ”

“ कांहीं तरी खूळ काढलं आहे झालं, सरकारनें सारं ! आमच्या लहानपणीं का शाळा नव्हत्या, का शिक्षक नव्हते, का होतं तरी काय ? आम्ही शिकलोंच नाहीं, का आपले जन्मभर ठोंब्येच राहिलों.... ? ”

“ हें पहा अण्णा, ” नाना म्हणाले, “आज कांहीं आपल्यापुढें बी. टी. नेमावा कीं नाहीं, किंवा ते चांगले शिक्षक असतात किंवा नसतात हा चर्चेचा विषय नाहीं. हे आले आहेत, यांना फक्त पहावयास तुम्हाला बोलावलें आहे. नाहीं का तात्यासाहेब. ”

“ पण नाना, एवढया मंडळीला निव्वळ रिक्त हस्तानेंच पाठवणार घरीं कीं कांहीं आहे सोय....? ”

“ त्याची काळजी नको बापू.... ” दुसरे एक बुभुक्षित म्हणाले, “ नानांच्या बागेंत कलमें जोंपर्यंत लागत आहेत तोंपर्यंत या दिवसांत बिलकूल काळजी करायला नको ! ”

एवढयांत कलमी आंब्यांच्या फोडी भरलेलीं दोन तीन ताटें मंडळींच्या पुढें पडलीं. नाना चांगले सधन असावेत. कारण ताटें चांदीचीं होतीं; तसेंच पाणी पिण्याचीं भांडींदेखील चांदीचीं होतीं.

जठराग्नि शांत करीत करीत एक गृहस्थ म्हणाले, “ सायन्सकरतां ते परवां एक गृहस्थ आले होते त्यांचें काय ठरवलंत, नाना,”

“ अहो त्यांत काय ठरवायचं आहे? तें तसलं ध्यान वर्गांत शिकवायला गेलं म्हणजे मुलें अभ्यास शिकण्याऐवजीं हें माकडच पहात बसावयाचीं!........ ”

" त्याच्या कपाळावर कसलें बरें तें एक टेंगूळ होतं कोणास ठाऊक! काय पण ध्यान होतं तें....अहो, पोरें म्हणजे शुद्ध माकडं असतात, माकडं! त्यांना धाकांत ठेवायला मनुष्यही जरा भव्य व मजबूत, आणि एकंदरींत अव्यंग असावा लागतो........ "

" बाकी यांच्या बाबतींत तशी कांहीं काळजी करावयास नको "

" पण एकदां तोंड पोळलं कीं मांजर सुद्धां दूध फुंकरून पितें म्हणतात ना! तेव्हां म्हटलं एकदां समक्षच पाहून घ्यावे हेडमास्तर कोणाला नेमावयाचें त्यांना. मग रुखरूख नको वाटायला.... "

नाना माझ्याकडे वळून म्हणाले—" मग कसं काय? तुम्हांला आमचें स्केल वगैरे सांगितलें आहेच. तेव्हां तूर्त आम्ही तुम्हांला पुढच्या एप्रिल अखेरपर्यंतची ऑर्डर देतों ७० ची. तुम्हाला पसंत आहे ना? "

" मी माझ्या अर्जांत किमान पक्ष पगार ८० रुपये घेईन असें लिहिलें होतें. तेव्हां आपण ह्यांत कांहींही फेरफार करणार नाहीं काय? "

" त्या बाबतींत आमचा निश्चय होऊन चुकला आहे कीं ७० वर एक कवडी द्यायची नाहीं. "

" मलाही मग आत्तांच तुम्हांला मी ७० पत्करतों असें सांगतां यावयाचें नाहीं. मी पुण्यास प्रथम जाईन, नंतर माझ्या वडिलांस विचारीन व त्या मंडळींची सल्ला मिळेल त्याप्रमाणें आपल्यास ताबड-तोब कळवीन. "

" बरं आहे; मग तुम्ही उद्यां पुण्यास पोंचाल. म्हणून उशीरांत उशीरां म्हणजे तेरवांपर्यंत आम्ही तुमच्या उत्तराची वाट पाहूं व नंतर मात्र आम्ही दुसरा कोणी नेमण्याची तजवीज करूं. आम्हांला

यापेक्षां वेळच नाहीं थांबायला....वास्तविक एवढा सुद्धां वेळ नाहींच आहे...." थोडें थांबून "आणि तुम्हांस तरी यांत ठरविण्यासारखं किंवा विचार करण्यासारखं आहे काय?"

"अहो मिळताहेत कुठें नोकऱ्या चांगल्या, या दिवसांत. चांगले ७० देत आहोंत आम्ही. म्हणा हो न् द्या सोडून झालें." तात्या-साहेब म्हणाले.

"तसं करतां येणार नाहीं; वडिलांच्या अनुमतीशिवाय मला आपणांस आज नक्की कांहींच सांगतां येणार नाहीं."

"बरें आहे. कांहीं हरकत नाहीं. मग आम्ही तुमच्या उत्तराची परवांपर्यंत वाट पाहतों. तोंपर्यंत उत्तर आल्यास ठीकच. नच आल्यास मग आम्हांस दुसरी तजवीज करणें भाग पडेल."

थोडया वेळानें बगाराम व मी त्याच्या घरीं परत आलों.

* * *

बगारामाच्या घरीं आल्यावर विसू केळकर त्याच्या घरीं आला. हा देखील नानासाहेबांच्या घरीं जमलेल्या गणांत होता. बगाराम, मग, म्हणाला—"मी आणि विसू येथें असल्यामुळेंच तुझ्या नोक-रीचें काम अधिक सुकर झालें. आम्हीच तुला प्रथम इंटर-व्ह्यूला बोलविण्याची खटपट केली. असला जॉब मिळणें काहीं सोपें नव्हे."

पुण्यास जातांना मी घडलेल्या हकीगतींचा विचार करूं लागलों. त्या वेळीं मला स्वत:ला ही नोकरी चांगली असूनही पत्करूं नये असेंच वाटूं लागलें. पहिली गोष्ट म्हणजे या लोकांचा एक प्रकारचा फाजीलपणा हा कीं ज्याप्रमाणें एखादी गाय विकत घेतांना फार चोखंदळपणा करतात त्याप्रमाणें हे लोक नोकर नेमतांना तो दिसतो कसा येथपासून त्याची परीक्षा करतात. जणूं

काय मास्तर म्हणजे लग्नाची मुलगीच अशी या लोकांची समजूत असावी असें मला वाटलें. पण यापेक्षां जास्त मोठा राग मला येण्याचें कारण म्हणजे यांनीं माझ्यासमोर केलेली बी. टी. झालेल्या शिक्षकांची निंदा. नसतील कदाचित् बी. टी. झालेले शिक्षक त्यांच्या धंद्यांत तज्ञ. म्हणून अपरिचित बी. टी. च्या तोंडावर बी.टी. शिक्षकांची नालस्ती करणें हें कांहीं सभ्यपणाचें नव्हतें. सरते शेवटीं बगाराम व विसू यांचा शिष्टपणा देखील मला आवडला नाहीं. त्यांनीं खरोखर माझ्याकरितां खटपट देखील केली असेल, मी नाहीं म्हणत नाहीं. पण तसें सांगण्याची किंबहुना एक प्रकारचा पेट्रनेज ( आश्रय देणें ) दर्शविणें त्या क्षणीं तरी मला फार अपमान-कारक वाटलें. शिवाय बगाराम व विसू केळकर हे माझ्या बरोबरीचे व तोलाचेच विद्यार्थी होते. तेव्हां त्यांचा वरचष्मा विनाकारण त्या गांवीं नेहमीं सोसणें हें माझ्या मनाला योग्य वाटेना. इतक्या कारणांस्तव व सरते शेवटचें व सर्वांत महत्त्वाचें कारण म्हणजे माझी चूल कांहीं खोळंबलेली नसल्यामुळें वडिलांचा थोडा रोष पत्करून देखील ‘ मी ही नोकरी पत्करूं इच्छित नाहीं ’ अशा अर्थाचें पत्र नानासाहेबांस पाठवून दिलें.

—रचनाकाळ, १७ मे १९३५.

# बाणेदार बेकार

" वैशाखमास वासंतिक समय शोभला....वगैरे " श्री. अण्णासाहेब किर्लोस्करांनीं रचलेलें सौभद्र नाटकांतलें पद्य, पुणें शहरास जितकें तंतोतंत लागू पडतें, तितकें तें दुसऱ्या कोणत्याच शहरास लागू पडणार नाहीं. किंबहुना कै. अण्णांनीं, तें वर्णन मनांत पुणें शहर आणूनच केलें असावें.... पण एकादा आधुनिक लेखक पुणें शहर हें मे महिन्यांतील महाराष्ट्रांतील मध्यम वर्गांतील लोकांचें गांठीभेटी घेण्याचें ठिकाण म्हणून वर्णन करील, तर तें बिलकूल सत्यास सोडून नाहीं.

आजच संध्याकाळीं मी माझे मामांचे घरीं कांहीं कामाकरितां गेलों होतों. त्या वेळीं त्यांचे तीनचार मित्र कोणी अण्णासाहेब, किंवा नानासाहेब, किंवा आणखीन् कोणी साहेब असतील, असे गप्पा सांगत बसले होते. त्यांतील एक खानदेशांतील प्रतिष्ठित गृहस्थ असून एका स्थानिक स्वराज्य संस्थेचे अध्यक्ष होते. एक दक्षिण विभागांत सबजज्जाच्या हुद्यावर काम करणारे होते; एक मामलेदार होते, व

एक स्थानिक वकील होते. माझे मामा हे एक पुण्यांतले साधारण दर्जाचे डॉक्टर आहेत. मी गेलों त्या वेळीं त्यांचा चर्चेचा विषय अलीकडील सुशिक्षितांची बेकारी हा होता. ही चर्चा सर्वत्रच चालते व म्हणून त्यांत विशेष काय असणार ? पण त्यांत विशेष होतें म्हणून तर हा सर्व या लिखाणाचा खटाटोप !

सबजज्ज म्हणाले—“ नुकतीच आमच्या खात्यांत एक जागीं रिकामी झाली होती, साध्या कारकुनाची. कांहीं जाहिरात वगैरे कांह दिलेली नव्हती. साधा मॅट्रिक मनुष्य नेमावयाचा होता, तर फर्स्ट-क्लास बी. ए. व एम्. ए. झालेल्या गृहस्थांचे देखील अर्ज होते. आणि एकंदर संख्या ६० वर होती ! ”

“ अहो यांत काय सांगतां नानासाहेब ! ” स्थानिक स्वराज्य संस्थेचे अध्यक्ष म्हणाले, “ मी माझा अनुभव सांगतों तो ऐका. आम्हांस एका सबओव्हरसियरची जरुर होती, व त्या जागेचा पगार सारा ४० रुपये होता. तेव्हां अनेक बी ई. झालेल्यांचे अर्ज आले होते. व त्यांत एका फर्स्ट क्लास बी. ई. चा होता !

याचे आधीं, जमलेल्या मंडळींचीं काय भाषणें झालीं होतीं तीं मला माहीत नव्हतीं. पण हीं बडींबडीं धेंडें अशीं भाषणें करून हास्यविनोद करीत होतीं. शेजारींच एक हापूसच्या आंब्यांच्या फोडींचें ताट पडलेलें असून त्यांचा यथेच्छ समाचार घेणें चालू होतें. .... पण या असल्या भेसूर परिस्थितीबद्दल खेद वाटणें हें त्यांचे भाषणांत मला कोठेंच आढळलें नाहीं. वास्तविक यांचीं मुलें-बाळें उद्यां पदवीधर झालीं म्हणजे तीं काय बेकार होणार नव्हतीं? पण मला हें सर्व भाषण लागण्याचें कारणही तसेंच झालें. स्थानिक स्वराज्याच्या अध्यक्षांनीं ज्या फर्स्ट क्लास बी. ई. चा आपल्या

भाषणांत उल्लेख केला होता, तो दुसरा तिसरा कोणी नसून मी स्वतःच होतों. मी तो अर्ज फार आशेनें केला होता. हे अध्यक्ष मामांचे मोठे दोस्त ! तेव्हां मामांच्या वशिल्यावर मला ती नोकरी अगदीं खात्रीनें मिळेल अशी आशा होती. पण " भरंवशाच्या म्हशीला........" म्हणतात त्यांतलीच गत झाली !

आज मात्र मी स्वस्थ न बसतां या रावसाहेबांची चांगलीच हजेरी घ्यावी असा विचार केला. तेव्हां प्रथमच मामांस उद्देशून मी म्हणालों—" मामा, मी आमची तरुणांची बाजू थोडीशी मांडू का ?"

शिळोप्याच्याच गप्पा मारावयाला जमलेल्या त्या मंडळींना उलट बाजू मांडणारा भेटल्यानें वादविवाद करावयास मिळेल व थोडी मजा येईल, म्हणून आनंदच वाटला. सबजज्ज म्हणाले—" वा, वा ! जरूर बोला तुम्ही. आम्हांला तुमची बाजू ऐकायचीच आहे एकदां."

" मी थोडा जास्त स्पष्टपणानें आपणा सर्व वडील मंडळीसमोर बोलणार आहें, तरी त्याचा राग मानूं नये अशी प्रथमच सूचना देतों....अत्तांच रावसाहेबांनीं ज्या फर्स्ट क्लास बी. ई. ची गोष्ट सांगितली, ती दुसऱ्या कोणाची नसून खास माझीच आहे.... "

" आं ! असें का ? आपणच वाटतं ते !....माफ करा अं.... "

" अहो, त्यांत माफ करण्यासारखं आहे काय ? वस्तुस्थिति होती ती आपण पुढें मांडलीत, झालं. दुसरं काय ?....पण मला जो आपणास थोडा दोष द्यावयाचा आहे तो एवढयाचसाठीं कीं, ही अशी दैन्यपूर्ण परिस्थिति पाहून आपल्यासारख्यांचें हृदय पिळवटून कां जात नाहीं, याबद्दल होय. माझीच गोष्ट घ्या. मी १९३३ सालीं बी. ई. झालों. त्याचे आधीं थोडीं वर्षेच सरकारनें बी. ई. च्या परीक्षेंत वर आलेल्या नंबरांना हमखास व मोठया पगा-

राच्या नोकऱ्या देणें बंद केलें होतें. आजचे सर एम्. विश्वेश्वरअय्या, दिवाणबहादूर गोडबोले किंवा रा. वर्तक हे फर्स्ट क्लास फर्स्ट बी.ई. जरी नाहींत तरी एल. सी. ई. च होते ना ? त्यांना त्यांच्या काळीं अनुकूल परिस्थिति मिळाली म्हणून ते आज हिमालयाप्रमाणें उंच दिसत आहेत. आम्हांला असली अनुकूल परिस्थिति द्या; मी सांगतों, मीदेखील त्यांच्यासारखा म्हतारा होईन त्या वेळपर्यंत असाच कोणी नामांकित पुरुष खास होईन ! पूर्वींच्या नामांकित व सुशिक्षित पुरुषांत आमच्यापेक्षां जास्त कांहीं विशेष गुण असेल तर तो म्हणजे परमेश्वरकृपेनें ते ३०।४० वर्षे आमच्या आधीं जन्मास आले ! त्यांच्यांत व आमच्यांत यापलीकडे कांहींच फरक नाहीं....पण इतकें दूर जावयास नको. ७।८ वर्षांपूर्वी जरी मी जन्मतों तरी आजमितीला मीहि एक मोटारवाला इंजिनिअर बनून आपल्या मांडीला मांडी लावून बसूं शकलों असतों; व मला आपल्याकडे नोकरीची भिक्षा मागण्याची पाळीच आली नसती !....आतां आपण आमच्याकरितां काय करितां बरें ? मी मुद्दामच मामांचा वशिला लावून अर्ज केला होता; पण त्याचा काय उपयोग झाला ? ....ही आमची परिस्थिति निर्माण कोणी केली ? किंवा कां झाली ? व ती दूर करण्याचे कांहीं इलाज आहेत कीं नाहींत असल्या गंभीर प्रश्नांचा तुमच्यासारख्या समाजाच्या धुरीणांनीं विचार करायचा नाहीं तर कोणी करायचा ? आमच्यासारख्या निर्धन व साधनरहित बेकारांनीं ? तुम्हाला अशा शिळोप्याच्या गप्पा मारतांना मनास थोडा खेद वाटावा व तुमच्या हातून हा आमचा प्रश्न उपेक्षिला जाऊं नये म्हणूनच मी मर्यादा सोडून देखील आपणांस थोडें तीव्र असें बोललों आहें तरी, आपण त्याचा राग मानूं नये. ”

ते सर्व रावसाहेब माझ्या भाषणानें थिजले. मामांनीं मला वाटेला लावून दिलें व मीदेखील लवकरच तेथून निघून गेलों. पाहूं या माझ्या भाषणाचा त्यांचेवर काय परिणाम होतो तो. पण बहुधा " नळी फुंकिली सोनारेंच.... " होणार, जास्त काय ?

—रचनाकाळ, २३ मे, १९३५ पहाटे, ३॥ ते ४॥.

# विमलचा संसार

" विमलाबाई केळकर, B. A.; B. P. N. A., मिडवाइफ व नर्स " अशा प्रकारची एक विचित्र पाटी दारावर पाहून मी थक्क झालों. याचेपूर्वी मि. केळकर B. A. LL. B. वकील ही पाटी मी पाहिलेली होती. पण मला विशेष थक्क होण्याचें कारण विमला बी. ए. होऊन-ही शिवाय मागाहून नर्सची हलक्या दर्जाची परीक्षा तिनें दिली होती हें होय. मला ती बी. ए. आहे हें माहीत होतेंच. पण ही नर्स झाल्याबद्दलची गोष्ट मला नवीनच दिसत होती. " विमलाताई आहेत का ? " म्हणून मी चौकशी केली.

दारावरच एक पोऱ्या होता त्यानें सांगितलें " बाईसाब घरांत न्हाईत, पन् वकीलसाब हायेत. "

मी मग वकीलसाहेबांकडेच गेलों. माझी व त्यांची फारशी ओळख नव्हती. पण विमलची माझी मैत्री होती. मी त्यांच्या माडीवर जाऊन बसलों. तेव्हां त्यानीं प्रथम विमल एका कामाला बाहेर गेली आहे, व तिची परत येण्याची वेळ झाली आहे, असेंही त्यांनीं सांगितलें.

नंतर इतर कुशल प्रश्न झाल्यावर ते चहा सांगण्याकरितां कदाचित् खालीं जाणार असतील, इतक्यांत मला दारावर दिसलेला पोऱ्याच माडीवर आला व म्हणाला....“ रावसाहेब, राधाकाकू म्हनत्याती, कुमार लइ तरास घेतो हाए, रडू रडू हैरान् झाला हाये, आन् दूध बिलकूल पीत न्हाइ. आपूनच त्येला दूध पाजावं.... ”

“ बरं, बरं. गेन्या खालीं जा, आणि राधाबाईना सांग दोन कप चहा करायला. मी येतों म्हणावं एवढ्यांत. ”

वकीलसाहेबांनीं नंतर मला टेबलावर पडलेला ‘ टाइम्स ’ व ‘ स्त्री ’ मासिकाचा अंक वाचावयास दिला आणि ते म्हणाले “ बाबूराव, जरा Excuse अं! कुमाराला तिचा व माझाच लळा आहे. शिवाय तो आजारी असल्यामुळें हल्लीं फारच चिरचिऱ्या झाला आहे. राधाबाई ह्याही नवीनच असल्यामुळें नसेल त्यांचेजवळ तो दूध पीत; मी जरा खालीं जाऊन येतों. आपण तोंपर्यंत हा ‘ टाइम्स ’ किंवा ‘ स्त्री ’ पाहात बसा. ” असें सांगून वकीलसाहेब खालीं निघून गेले. सुमारें दहा मिनिटें झालीं. मी तोंपर्यंत वर्तमानपत्र व मासिक चाळीत बसून राहिलों होतों. मधून मधून मला एका मुलाचें रडणें ऐकूं येत होतें; व वकीलसाहेबांचा मुलाबरोबरचा संवादही ऐकूं येत होता. शेवटचीं एक दोनच वाक्यें फक्त मी देतों.

“ होऽहो बाळ, किती रडतोस हा ! उगी हं, हें एकच बोंडलं राहिलं ! तेवढं पी बरं बाळ. आत्तां इतक्यांत आई येईल बाळाची, मग ती बाहेर जायला निघाली तर आपण ठोक देऊं तिला.... शहाणा आहे हो बाळ आमचा ! ”

थोड्या वेळांत वकील साहेब कुमारला घेऊन माडीवर आले. तो सुमारें अडीच वर्षांचा होता, पण दिसत होता वर्षा-दीड वर्षाच्या

मुलासारखा ! अगदीं हातापायाच्या काडया झाल्या होत्या बिचाऱ्याच्या! पण तोंडावर हुषार व डोळे तर फारच तेजस्वी दिसत होते, गुलामाचे ! मला मुलें घ्यावयाला आवडत नाहींत मुळींच, आणि त्यांतून रोगट मुलांना मी स्पर्शसुद्धां करावयास धजणार नाहीं ! पण काय असेल तें असो, मला नकळत माझे हात पुढें झाले, व माझ्या तोंडून खालील शब्द बाहेर पडले !

" इकडे ये बाळ, तुला खाऊ पाहिजे ? " असें म्हणून मी एक हात खिशांत कोंबला....पण तो आपल्या वडिलांस जास्तच बिलगला ! बाकी तें माझ्या पथ्यावरच पडलें, म्हणा ! मी लगेच म्हणालों " बरं बरं, नाहीं घेत अं मी ! "

गेनूनं एका ट्रेमध्यें चहाचे कप व बिस्किटांच्या बशा असें साहित्य टेबलावर आणून ठेविलें. अर्थात् वकील साहेबांनीं ' घ्या ' म्हटल्यावर अस्मादिकांनीं त्यावर चांगलाच ताव मारला व वकील साहेब एकीकडे कुमारास संभाळून नेमस्तपणानें जें काय चहापान करतां येत होतें तेवढेंच करीत होते. इतक्यांत खालीं मला विमलाताईचा आवाज ऐकूं आला. " गेन्या, त्या टांगेवाल्याला हे चार आणे नेऊन दे जा....आणि वर कोण आलं आहे रे ? "

" कोन तरी हायेती एक गिऱ्हस्त. "

" बरं जा, टांगेवाल्याला हे पैसे दे प्रथम. "

जिन्याच्या पायऱ्यांवरून कोणी तरी धांवत धांवत चढत आहे असा आवाज ऐकूं आला. कुमार वकीलसाहेबांच्या मांडीवर चुळबूळ करूं लागला, माझे डोळे दाराकडे लागून राहिले....एवढयांत विमला एक पांढरें शुभ्र लुगडें नेसलेली अशी, दारांत उभी राहिली. मला पाहतांच ती म्हणाली, " ओ, हो ! केव्हां आलं वऱ्हाड पुण्यांत! "

" चार दिवस झाले येऊन आम्हांला. "

लगेच ती कुमारकडे गेली व टिचक्या वाजवून तिनें त्याला उचलून घेतलें, व त्याचा एक गोडसा पापा घेतला. किंचित स्मित करून ती त्याला म्हणाली " अरे लबाडा, आतां कशी कळी खुलली आहे एका स्वारीची ! "....नंतर वकील साहेबांस ती म्हणाली " त्रास दिलेला दिसतोय, गुलामानं, आपल्याला. "

" कांहीं फारसा नाहीं, दूध पाजावं लागलं मला.... "

" काय रे गुलामा, त्रास देतोस नाहीं कां यांना ! असं करूं नये बाळ.... "

" त्याला काय कळतंय, बरं, राधाबाई नवीनच, तेव्हां राहीना त्यांजजवळ झालं. "

" हा अस्सा एक वर्षभर सारखा आजारी आहे कुमार आमचा, त्यामुळें यांनाही धड धंदा करतां येत नाहीं, व मलाही कुठें बाहेर जायचं म्हणजे जिवावर येतं. पण करायचं काय, पोटाला मिळवलं तर पाहिजे ना ? "

" बरोबर आहे तें ताई; लोकांना काय होतंय हंसायला, कोणी चार चव्वल आणून देतोय् का...."

" आम्ही मुळी अलीकडे कुणाच्या बोलण्याचालण्याची क्षिती बाळगीनासेच झालों आहोंत..... पण तें जाऊं द्या. कमाला केव्हां घेऊन येणार आहांत एकदां ? अन् तुमचा श्री आतां चांगला बोलायला लागला असेल, नाहीं कां ? "

" हो अगदीं सगळं कांहीं येतं बोलायला चोराला. आम्ही येऊं दोनचार दिवसांत एकदां....पण, आपली स्वारी असेल कां घरीं त्या वेळीं ? नाहीं तर आजच्या सारखी अशीच कुठें व्हिजिट बिजिट्...."

" नेहमींच कुठं मिळताहेत व्हिजिटा ! हल्लीं दरएक आळीला एकेका नर्सची पाटी दिसेल तुम्हाला आमच्या पुण्यांत.... आणि मॅटर्निटी होम्स देखील कांहीं कमी नाहींत सांपडायचीं ! "

हातांतील रिस्टवॉचकडे बघून मी म्हणालों—" साडे दहा वाजले कीं ! बरं आहे, उशीर झाला बराच, नाहीं ? येऊं आम्ही एक दिवस चारच्या सुमारास, ....पण तुम्ही जर एखाद वेळीं आमच्या बाजूलाच व्हिजिटला आलांत तर येऊन जा एकदां उभ्या उभ्या. ....कारण जास्त जोरानें बोलतांच येत नाहीं आम्हाला, आपल्या कुमाराकडे पाहून. "

" बघेन जमल्यास मी. "

लवंग, वेलदोडा खाऊन व ज्येष्ठमधमिश्रित कुटलेल्या स्वादिष्ट सुपारीचा एक बोकणा भरून मी त्यांची रजा घेतली.

* * * * *

" बाहेरून यायला आज फार उशीरसा झाला स्वारीला ? "

" अशीच गेली होती मोहिमेवर ! " जरा थांबून " आज एक गम्मत मिळाली पहायला. मनोहर स्त्री संगीत मंडळी जें एक " स्त्री साम्राज्य " नाटक करीत असे त्याचाच नमुना आज प्रत्यक्ष पाहून आलों ! "

" कोणचाही एकादा जगाचा चांगला भूगोल वाचा, ब्रम्हदेशांत " स्त्रीसाम्राज्य " चालूंच आहे असें तुम्हांस आढळेल. "

" ब्रम्हदेश राहूं द्या तूर्त, दूर. आपली विमलाताई आहे ना, तिच्याकडे गेलों होतों मी सहज. ती हल्लीं नर्स झाली आहे नर्स ! बी. ए. होऊन नंतर नर्स होणारी, ही मला वाटतें पहिलीच महा-

राष्ट्रीय महिला असेल, म्हणून एकाद्या जाहीर सभेंत तिचें अभिनंदन नको का करायला? "

"आपली ही थट्टा दूर ठेवा सध्यां. एकादी सुशिक्षित पदवीधर स्त्री नर्स झाली. तर त्यांत एवढें बिघडलें काय? त्यांतून ती माझ्यापेक्षां तुमचीच जास्त मैत्रीण आहे, तेव्हां तिची अशी थट्टा करणें शोभत नाहीं, आपल्याला."

"मी तिची थट्टाच करीत नाहीं मुळीं. तिचा संसार आज थोडा डोळ्यांना दिसला, तो विचित्र वाटला म्हणून हंसतो आहे झालं मी."

"असं काय विचित्र आहे तिच्या संसारांत हो?"

"काय विचित्र नाहीं बरं? तिनें बाहेर जाऊन पैसा मिळवावा आणि नवऱ्यानं मुलाचें हगणें–मुतणें करणं हें विचित्रच नव्हे काय?"

"हें बिलकूल विचित्र नाहीं. ही एक प्रकारची आपत्ति आहे, म्हणूनच विमलाताई नर्सचा धंदा करीत आहे. मला तिची तुमच्यापेक्षां जास्त माहिती आहे. तिच्या यजमानांस उभ्या दीड वर्षांत वकीलींत पै मिळाली नाहीं! व उलट जवळ असलेलेच दीड हजार रुपये खलास झाले! तेव्हां विमलनेंच त्यांना सुचवून नर्सची परीक्षा देऊन आतां ती दरमहा ६०।७५ रुपये मिळवून दोघांचा चरितार्थ चालवीत आहे. वकीलसाहेबांनीं मुलाचें हगणें मुतणें केलें नाहीं तर नवराबायकोंना उपाशी मरावें लागेल समजलांत?"

"पण विमलेनें नर्सचीच नोकरी कां करावी? काय दुसरा तिसरा प्रतिष्ठित धंदा नाहीं?"

"नर्सच्या धंद्यांत अप्रतिष्ठितपणा आहेच कुठें मुळीं? शिवाय तुमचा कालिदासच रडतो आहे शाकुंतलांत....पशुमारण कर्मासारखें हलकें काम श्रोत्रियांना देखील करावें लागतें म्हणून....पण तो विषय

जाऊं द्या, तूर्त. विमलनें शिक्षकिणीची नोकरी पुष्कळ शोधली व अखेर कंटाळूनच तिला हा मार्ग पत्करावा लागला."

"तें कांहीं असलें तरी नवऱ्यानें घरीं बसून राहणें व मुलें बाळें संभाळणें, आणि बायकोनें बाहेर जाऊन पैसा मिळविणें हें मला तरी अगदीं विचित्र व गैर दिसतें."

"पण संसार सुरळित चालवायला, आपद्धर्म म्हणून देखील ही अप्रिय गोष्ट करावयास नको काय? वकीलसाहेब खरोखर धैर्यशील व अभिनंदन करण्यासारखे पुरुष आहेत, असेंच म्हटलें पाहिजे. आपल्या दुर्दैवानें जर आपण त्यांच्या परिस्थितींत असतों, तर तुम्ही, पुरुष जातीच्या पोकळ अभिमानानें खात्रीनें कर्जबाजारी बनून रसातळाला गेलां असतात...."

"रसातळाला जाण्याच्या अप्रिय गोष्टी कशाला पाहिजेत आपल्याला? माझ्या मनावर जे पूर्वापार चालत आलेले हिंदु संस्कार आहेत त्यामुळें मला तें विचित्र वाटलें व मी तसें स्पष्टपणानें तुला सांगितलें. तुला नसेल तसें वाटत तर गोष्ट निराळी."

"असें नुसतें वाटण्याचा हा प्रश्न नाहीं. अलीकडच्या पुष्कळ शिक्षित व पदवीधर स्त्रिया लग्न झाल्यावरही पैसा मिळविण्याचा दुसरा उद्योग कां करतात व त्यांनीं तसा तो करावा काय असा एक मोठा प्रश्न याच्या बुडाशीं आहे."

"आपल्याला नाहीं बोवा तो गहन प्रश्न ठाऊक." असें म्हणून मी गालांतल्या गालांत हसूं लागलों.

"समजलं मला आपलं छद्मीपणाचं हसणं आणि इतका वेळपर्यंतचा वाद खेळणं. मला इतका वेळ उगीचच चिडवलीत नाहीं का?"

" बरोबर ओळखलंस. तूं, सफरेजेट आहेस, वामनराव जोशांच्या उत्तरेप्रमाणें; स्त्रियांची बाजू घेऊन भांडतेवेळचा तुझा आवेशपूर्ण चेहरा मला फार आवडतो, म्हणून मी मुद्दाम तुझ्याशीं वाद केला. " तिचा चेहरा लज्जेनें आरक्त झाला.

थोडा वेळ थांबून मी पुनः म्हणालों. " गेल्या ७।८ वर्षांत विवाहित पण पदवीधर स्त्रिया पैसा मिळवण्याचा उद्योग कां करूं लागल्या आहेत हें मला पूर्ण माहीत आहे. एक तर त्यांस आपल्या शिक्षणाचा उपयोग करावासा वाटतो. दुसरें, स्वतःचा पैसा असावा हीही त्यांची एक इच्छा असते, व क्वचित् प्रसंगीं कुटुंबपोषणास मदत करण्याची ही त्यांची प्रामाणिकपणाची इच्छा असते. म्हणूनच त्या नोकरी करण्यास प्रवृत्त होतात. आणि त्यामुळें त्यांचे संसार सामान्य मनुष्याला जरी विचित्र आढळले तरी त्यांत हंसण्यासारखें काय आहे? "

कमानें " हियर हियर " म्हणून खूप टाळ्या वाजवल्या. " जणूं काय एकाद्या सभेंत व्यासपीठावरून नोकरी करणाऱ्या सुशिक्षित पदवीधर स्त्रियांची वकीलीच केलीत म्हणायची! आपल्या या सुंदर भाषणाबद्दल आपले आभार मानावयास मजजवळ शब्दच नाहींत! "

—रचनाकाळ, ता. २८।५।३५ वेळ एकूण २। तास.